






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

ऑक्टोबर ते डिसेंबर २०१५




८९व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस

अं । त । रं । ग



अनुक्रमणिका



# जन्मशताब्दी अभिवादन



**गो. नी. दांडेकर**
ज्येष्ठ कादंबरीकार



**संजीवनी मराठे**
ज्येष्ठ कवयित्री

# मन:पूर्वक अभिनंदन!



**गंगाराम गवाणकर**
अध्यक्ष,
९६वे अखिल भारतीय मराठी नाट्य संमेलन



**डॉ. रावसाहेब कसबे**
अध्यक्ष,
पाचवे सम्यक साहित्य संमेलन



**डॉ. रामचंद्र देखणे**
अध्यक्ष, मसापचे २४वे विभागीय
मराठी साहित्य संमेलन, भोसरी



**अरुण खोपकर**
यंदाचा साहित्य अकादमी सन्मान



**श्रीकांत बहुलकर**
यंदाचा साहित्य अकादमीचा 'भाषा सन्मान'

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५३, ऑक्टोबर - डिसेंबर २०१५








**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३

संकेतस्थळ : www.masapapune.org

ई-मेल : masaparishad@gmail.com

(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका










◆

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
◆
संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**
◆
अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**
◆
मुखपृष्ठ
**जयदीप कडू**
◆
छायाचित्र सौजन्य
**ल. म. कडू**
**संदेश भंडारे**
◆
मुद्रितशोधन
**अशोक देव**
◆
मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
**महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना**
**सदाशिव पेठ, पुणे**
**४११०३०.**
◆
**मूल्य : १५ रुपये**
◆
प्रकाशन क्र. ३५३
ऑक्टोबर-डिसेंबर २०१५
◆



# अंतरंग



अनुक्रमणिका





# संपादकीय

**महेंद्र मुंजाळ**

२०१५ या वर्षातला हा शेवटचा अंक. हा अंक वाचकांच्या हाती पडेल तोवर नवे वर्ष उजाडलेले असेल. या नव्या वर्षाच्या सर्वांना मन:पूर्वक शुभेच्छा.

बरोवर गेल्या वर्षी याच महिन्यात आमच्या संपादक मंडळाच्या कार्यकाळातला पहिला अंक प्रसिद्ध झाला. आणि आज हा पाचवा अंक वाचकांच्या हाती पडत आहे. या सर्वच अंकांना जाणकार वाचकांनी भरभरून प्रतिसाद दिला याचे विशेष समाधान आम्हाला सर्वांना आहे.

या अंकाच्या निमित्ताने अलीकडच्या काळातील साहित्य-सांस्कृतिक क्षेत्रातील काही महत्त्वाच्या घडामोडींवर प्रकाश टाकावासा वाटतो.

देशातील वाढत्या असहिष्णुतेचा निषेध करत महाराष्ट्रातील तसेच देशातील काही साहित्यिकांनी आपले सरकारी पुरस्कार परत केले. अलीकडच्या काही घटना पाहता देशात असहिष्णू वातावरण वाढत चालले आहे, टोकाचा धर्माभिमान वाढत चालला आहे, ही गोष्ट खरी आहे. देशासाठी ही गोष्ट नक्कीच चांगली नाही. त्याचा तीव्र निषेध केलाच पाहिजे. अर्थात लेखकांनी पुरस्कार परत करणे, हे त्याच्यावरचे एकमेव उत्तर नाही. अशा शक्तींवर कारवाई करण्यासाठी सरकारवर आणखी काही वेगळ्या मार्गांनी दबाव आणण्याची गरज आहे. ते मार्ग कोणकोणते हे समविचारी मंडळींनी एकत्र येऊन ठरवले पाहिजे असे वाटते.

८९वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन दि. १५, १६, १७ व १८ जानेवारी २०१६ रोजी पिंपरी चिंचवड येथे होत आहे. हे संमेलन आयोजित करण्याचा मान यंदा डॉ. डी. वाय. पाटील अभिमत विद्यापीठाला मिळाला आहे. या संमेलनाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ साहित्यिक-समीक्षक-विचारवंत डॉ. श्रीपाल सबनीस यांची निवड झाली आहे. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन! उद्योगनगरी म्हणून प्रसिद्ध असलेल्या आणि देहू-आळंदीसारख्या पवित्र संतभूमीचा शेजार लाभलेल्या पिंपरी-चिंचवड या नगरीमध्ये होत असलेले हे संमेलन सर्वार्थाने वैशिष्ट्यपूर्ण, संस्मरणीय आणि सर्वसमावेशक व्हावे यासाठी या संमेलनाचे स्वागताध्यक्ष डॉ. पी. डी. पाटील आणि त्यांचे सर्व सहकारी, तसेच महामंडळाचे सर्व पदाधिकारी आणि सदस्य सर्वतोपरी प्रयत्नशील आहेत.

त्याचबरोबर ९६ व्या अखिल भारतीय मराठी नाट्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ नाटककार गंगाराम गवाणकर यांची निवड झाली आहे. त्यांचेही मन:पूर्वक अभिनंदन.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे २४ वे विभागीय मराठी साहित्य संमेलन दि. १ व २ डिसेंबर २०१५ रोजी मसापच्या भोसरी शाखेच्या वतीने आयोजित करण्यात आले होते. या संमेलनाचे अध्यक्षस्थान संतसाहित्याचे अभ्यासक डॉ. रामचंद्र देखणे यांनी भूषविले. या संमेलनालाही रसिकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.

अलीकडेच पार पडलेल्या पाचव्या सम्यक् साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थान ज्येष्ठ विचारवंत-समीक्षक व मसापचे उपाध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांनी भूषविले. त्याचबरोबर चित्रपट अभ्यासक-लेखक अरुण खोपकर यांना 'चलत् चित्रव्यूह' या पुस्तकाला यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार तर अकादमीचाच 'भाषा सन्मान' पुरस्कार लेखक-संशोधक श्रीकांत बहुलकर यांना जाहीर झाला आहे. या सर्वांचे मन:पूर्वक अभिनंदन.

या वर्षात लोकप्रिय कादंबरीकार गो. नी. दांडेकर आणि कवयित्री संजीवनी मराठे या दोन साहित्यिकांची जन्मशताब्दी सुरू आहे. मराठी साहित्यात या दोघांचेही योगदान मोलाचे आहे. जन्मशताब्दीच्या निमित्ताने या दोन्ही साहित्यिकांचे स्मरण करीत असतानाच त्यांना मन:पूर्वक अभिवादन.

ज्येष्ठ लेखक लक्ष्मण लोंढे, 'टॉनिक' या दिवाळी अंकाचे संपादक कृष्णा लक्ष्मण मानकर उर्फ मानकरकाका, ज्येष्ठ अनुवादक मीना वांगीकर आणि प्रसिद्ध लेखक-नाट्यदिग्दर्शक मुरली खैरनार यांचे अलीकडेच निधन झाले. लोंढे यांनी मराठी विज्ञान साहित्यात दिलेले योगदान अतिशय महत्त्वाचे आहे, तर सदैव मुलांमध्येच रमणाऱ्या

अनुक्रमणिका

मानकरकाकांनी ज्ञानाबरोबरच मुलांचे मनोरंजनही व्हावे, या उद्देशाने 'टॉनिक' नावाचा दिवाळी सुरू केला आणि ३६ वर्षे विविध विषय कल्पकतेने हाताळत त्यांनी तो नेटाने आणि निरलस वृत्तीने चालवला. मीना वांगीकर यांनी कन्नड भाषेतील दर्जेदार साहित्य मराठीत अनुवादित करून अनुवादाच्या प्रांतात मौलिक भर घातली आहे. तर अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या आणि बहुचर्चित ठरलेल्या 'शोध' या कादंबरीचे लेखक मुरली खैरनार हे एक अभ्यासू लेखक म्हणून परिचित होते. मराठी साहित्यविश्वात या सर्वांचे योगदान अतिशय महत्त्वाचे आहे. या सर्वांना भावपूर्ण आदरांजली.

आता या अंकाविषयी.

८९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस यांची ओळख प्रामुख्याने सामाजिक बांधिलकी मानणारा साहित्यिक-समीक्षक-विचारवंत अशी आहे. त्यांची मांडणी निर्भीड आहे. त्यांची जडणघडण मूलतः मार्क्सवादाच्या मुशीतून आणि चळवळीतून झाली आहे. चळवळीतून आणि आपल्या साहित्यातून ते नेहमीच शोषित-पीडित समाजाचा आवाज बनले आहेत. त्यामुळे त्यांची समीक्षा केवळ पुस्तकी किंवा पठडीतली न राहता ती सामाजिक आणि सांस्कृतिक समीक्षा झालेली आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक संचितात महत्त्वाची भर घालणाऱ्या डॉ. सबनीस यांच्या व्यक्तिमत्त्वावर व कार्यकर्तृत्वावर थोडक्यात प्रकाश टाकणारा लेख पत्रकार-कवी संतोष शेणई यांनी लिहिला आहे. त्याचबरोबर अलीकडेच निधन झालेल्या मुरली खैरनार यांच्या व्यक्तिमत्त्वाचे काही पैलू उलगडतानाच त्यांच्या 'शोध' या बहुचर्चित कादंबरीच्या अंतरंगावर प्रकाश टाकणारा विशेष लेख कवी-कथाकार बालाजी सुतार यांनी लिहिला आहे.

ज्येष्ठ कवी-समीक्षक वसंत आबाजी डहाके यांनी अलीकडेच साहित्य अकादमीने आयोजित केलेल्या 'युवा मराठी काव्योत्सवा'त युवा कवींच्या अभिव्यक्तीला दाद देणारे महत्त्वपूर्ण भाषण केले. त्यांनी या भाषणात मांडलेले विचार या अंकात वाचायला मिळतील. त्याचबरोबर मराठवाडा साहित्य परिषदेच्या सहाव्या मराठवाडा लेखिका संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. छाया महाजन यांचे साहित्य व्यवहाराचा कानोसा घेणारे संपादित भाषणही या अंकात वाचायला मिळेल. ही दोन्ही भाषणे वाचकांना वेगळे भान देणारी आहेत.

गेल्या तीन अंकांत प्रसिद्ध झालेल्या 'समकालीन कवी' या मालिकेला वाचकांचा खूप चांगला प्रतिसाद मिळाला. गेल्या तीन अंकांत समकालीन महत्त्वाचे कवी श्रीधर नांदेडकर, दिनकर मनवर आणि कल्पना दुधाळ यांची मनोगते आणि त्यांच्या कवितेवर ज्येष्ठ समीक्षक-आस्वादक प्रभा गणोरकर यांचे भाष्य प्रसिद्ध झाले. या अंकात या मालिकेतला प्रभा गणोरकर यांचा चौथा लेख अस्वस्थ काळाची स्थिती मांडणारे महत्त्वाचे कवी अजय कांडर यांच्या कवितेचा परामर्ष घेणारा आहे. त्याचबरोबर अजय कांडर यांनीही आपल्या कवितेचा प्रवास उलगडणारे मनोगत लिहिले आहे.

कल्पक प्रकाशकांच्या विविध प्रकल्पांची ओळख करून देणारे 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरात सुजाता शेणई यांनी 'शब्दालय' प्रकाशनच्या सुमती लांडे यांच्याशी संवाद साधला आहे. श्रीरामपूरसारख्या आडबाजूच्या तालुक्याच्या गावी असूनही प्रकाशन क्षेत्रात त्यांनी आपला वेगळा ठसा उमटवला आहे. सुमती लांडे यांची या व्यवसायातील थक्क करणारी वाटचाल या अंकात वाचायला मिळेल.

१९७५ नंतरच्या काळातील स्त्रीवादी साहित्याचा व्यापक कालपट उलगडणारा 'भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य' हा ग्रंथ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने येत्या साहित्य संमेलनात प्रसिद्ध होत आहे. स्त्रीवादाच्या अभ्यासक डॉ. अश्विनी धोंगडे यांनी या ग्रंथाचे संपादन केले आहे. या ग्रंथाला डॉ. धोंगडे यांनी स्त्रीवादाची व्यापक पार्श्वभूमी मांडणारी दीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. या निमित्ताने या प्रस्तावनेतील संपादित भाग या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.

कवी विश्वास वसेकर यांच्या 'तरी, आम्ही मतदारराजे' या कवितासंग्रहावर मार्मिक भाष्य करणारा ज्येष्ठ समीक्षक डॉ. गंगाधर पानतावणे यांचा लेख, सुशील धसकटे या तरुण लेखकाच्या 'जोहार' या कादंबरीचा व्यापक पट उलगडणारा नव्या दमाचे अभ्यासक भूषण राक्षे यांचा महत्त्वपूर्ण लेख, तरुण प्राध्यापक विनायक लष्कर यांच्या 'वडार समाज : समाजशास्त्रीय अभ्यास' या ग्रंथाचे अंतरंग उलगडणारा ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्ते-अभ्यासक बाळकृष्ण रेणके यांचा लेख हेही या अंकातील वैशिष्ट्यपूर्ण लेख ठरावेत. याशिवाय, 'निवडक नवे' या सदरात डॉ. चंद्रकांत पोतदार, डॉ. अविनाश सांगोलेकर आणि नंदा सुर्वे यांनी अलीकडच्या काही महत्त्वाच्या पुस्तकांची परीक्षणे लिहिली आहेत.

साहित्यविश्वातील अलीकडच्या काळातील महत्त्वाच्या घटना-घडामोडींची, ग्रंथांची नोंद घेणारा हा अंकही वाचकांना आवडेल अशी आशा आहे. आपल्या प्रतिसादाच्या अपेक्षेत,

◆

**महेंद्र मुंजाळ**

**भ्रमणध्वनी :** ७७४४८२४६८५

mahendramunjal@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे - ४११०३०**

# म. सा. परिषदेच्या पंचवार्षिक (सन २०१६ ते २०२१) निवडणुकीसंबंधी निवेदन

### कार्यकारी मंडळाने निश्चित केलेला निवडणुकीचा कार्यक्रम

१) कार्यकारी मंडळाच्या वतीने निवडणुकीसाठी मतदानास पात्र असलेल्या मतदार सभासदांच्या यादीची एक मूळ प्रत निर्वाचन मंडळाच्या स्वाधीन करणे - **१५ डिसेंबर २०१५**

२) मतदार यादीतील नावे तपासण्याची मुदत - **१५ डिसेंबर ते २१ डिसेंबर २०१५**

३) मतदार याद्यांची अंतिम प्रत निर्वाचन अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्याची अंतिम तारीख - **२५ डिसेंबर २०१५**

४) अंतिम मतदार यादी निर्वाचन मंडळाने जाहीर करण्याची तारीख - **३० डिसेंबर २०१५**

५) उमेदवारांसाठी आवेदनपत्र उपलब्ध होण्याचा कालावधी - **११ जानेवारी २०१६ ते १६ जानेवारी २०१६ (सायं. ७ वाजेपर्यंत)**

६) आवेदनपत्रे स्वीकारण्याची मुदत - **१९ जानेवारी २०१६ ते २२ जानेवारी २०१६ (सायं. ७ वाजेपर्यंत)**

७) आवंदनपत्रांची छाननी व वैध आवेदनपत्रे जाहीर करणे - **२३ जानेवारी २०१६ (सायं. ५ ते ७ वाजेपर्यंत)**

८) उमेदवारी अर्ज मागे घेण्याची तारीख - **२५ जानेवारी २०१६ (सायं. ७ वाजेपर्यंत)**

९) उमेदवारांची अंतिम यादी जाहीर करणे - **२७ जानेवारी २०१६ (सायं. ७ वाजेपर्यंत)**

१०) मतपत्रिका मतदारांकडे पाठविण्याची तारीख - **५ फेब्रुवारी २०१६**

११) मतपत्रिका मतदारांकडून परत येण्याची अंतिम तारीख - **१४ मार्च २०१६ (सायं. ७ वाजेपर्यंत)**

१२) निवडणुकीचा निकाल - **१५ मार्च २०१६**
सकाळी ९ वाजल्यापासून मतमोजणीस प्रारंभ होईल. मतमोजणी पूर्ण झाल्यावर निकाल जाहीर केला जाईल.

**विशेष सूचना :**

१) आवेदनपत्राचे मूल्य रु. ५००/- असेल.

२) निवडणुकीसंदर्भातील सर्व कामकाज सोमवार ते शनिवार महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या कार्यालयीन वेळेत होईल. (रविवारी सुट्टी) कार्यालयाची वेळ : सकाळी ९॥ ते १२ आणि संध्याकाळी ५ ते रात्री ७

३) या निवडणूक प्रक्रियेत काही अडचण आल्यास फेरबदल करण्याचे अंतिम अधिकार निर्वाचन मंडळाला असतील.

**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह, म.सा.प., पुणे



अनुक्रमणिका



## निमित्त : साहित्य संमेलन

संतोष शेणई



# श्रीपाल सबनीस सामाजिक बांधिलकी मानणारा विचारवंत

पिंपरी-चिंचवड या कामगारांच्या गावात होणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी डॉ. श्रीपाल सबनीस यांची झालेली निवड औचित्याची आहे. समाजातील शोषितवर्गाचा आवाज होण्याचं काम डॉ. सबनीस यांनी आयुष्यभर केलं. औद्योगिक क्रांतीपासून जागतिकीकरणापर्यंत प्रत्येक काळात कामगाराचं शोषण झालेलं आहे. त्याच्यावर सतत नोकरीचं दडपण असतं. या कामगारांचा आवाज बनण्याची संधी डॉ. सबनीस यांना या निमित्ताने मिळाली आहे. डॉ. सबनीस यांचं लेखन मी वाचलं होतं. त्यांची तडाखा देणारी काही भाषणंही ऐकली होती. खरं सांगायचं तर प्रथमदर्शनी त्यांच्याविषयी फारसं चांगलं मत झालं नव्हतं. व्यासपीठावरचे आक्रमक सबनीस मनात वेगळी प्रतिमा निर्माण करतात, आणि मग व्यासपीठावरून खाली उतरल्यानंतर अतिशय मृदू वागणारे सबनीस तुम्हाला वेगळेच वाटू लागतात. त्यांचं हे मृदू रूप मला फार उशिराने दिसलं- ते निवृत्तीनंतर पुण्यात राहायला आल्यावर. पण त्यानंतर अतिशय वेगाने त्यांच्या स्नेहाच्या अंतर्वर्तुळात मी सामील झालो. अर्थात यालाही त्यांचाच स्वभाव कारणीभूत आहे. नित्याच्या व्यवहारात काय किंवा ज्ञानाच्या क्षेत्रात काय, त्यांचं स्वागतशील व सदैव ताजं व्यक्तिमत्त्व तुम्हाला आपल्याकडे खेचून घेतं.

डॉ. सबनीस मूळचे मराठवाड्यातील. लातूर जिल्ह्यातील हाडोळी हे त्यांचं गाव. या गावातील जिल्हा परिषदेच्या शाळेत त्यांचं प्राथमिक शिक्षण झालं. एका जमीनदार घराण्यात जन्मलेले श्रीपाल लढण्याचं बाळकडू घेऊन आले आहेत. त्यांचे वडील मोहन सबनीस यांनी हैदराबादच्या मुक्तिसंग्रामात सहभाग घेतला होता. स्वातंत्र्याची आस आणि अन्यायाविरुद्ध लढा हे श्रीपाल सबनीस यांचंही जीवनसूत्र राहिलं आहे. प्रखर अशी तत्त्वनिष्ठा व सत्यनिष्ठा सांभाळणारं त्यांचं व्यक्तिमत्त्व धारदार दिसू लागतं. कोणी असत्यकथन करू लागलं किंवा आपल्याच तत्त्वांना मुरड घालताना दिसून आलं की ते आक्रमक होतात. प्रसंगी तत्त्वांना मुरड घालून लाभ मिळवण्याचा व्यवहार त्यांना कधी समजला नाही, जमला नाही. साहजिकच त्यांची स्वाभाविक मृदुताही प्रथमदर्शनी लक्षात येत नाही. त्यांच्याविषयी गैरसमज करून घेण्यासाठी हे पुरेसं ठरतं.

लातूरला पदवीचं शिक्षण घेत असतानाच सबनीसांमधील लेखकाचं लातूरकरांना दर्शन घडलं होतं. ते त्या वेळी नाटकात रमले होते. त्यांनी त्या वेळी लिहिलेल्या 'शुक्राच्या चांदणीचे वगनाट्य' या एकांकिकेला सुवर्णपदक मिळालं होतं. पुढे 'तू शुक्राची चांदणी' या शीर्षकाने हे वगनाट्य प्रकाशितही झालं. नरहर कुरुंदकर यांची या पहिल्या पुस्तकाला प्रस्तावना आहे. हे नाटक व्यावसायिक रंगभूमीवर गाजलं होतं. सुहास भालेकर यांनी दिग्दर्शित केलेल्या या नाटकात माया जाधव काम करत होत्या. सुबल सरकार नृत्यदिग्दर्शक होते. प्रखर वैचारिक मांडणीसाठी आणि रोखठोक भूमिकेसाठी प्रसिद्ध असलेले सबनीस यांनी लेखनाची सुरुवात फार वेगळ्या वाटेवर केली होती.

त्यांना समाजवादाचं आकर्षण पहिल्यापासून होतंच. त्यातच एम. ए. करण्यासाठी ते नांदेडला गेले, नरहर कुरुंदकर यांचे विद्यार्थी झाले आणि त्यांच्या विचारांना खऱ्या अर्थाने आकार मिळाला. कुरुंदकरांचा आक्रमकपणा, त्यांचं वक्तृत्व, तर्काच्या आधारे समोरच्या मांडणीतील त्रुटी उघड करण्याची रीत सबनीसांनी उचलली. सबनीसांमधील एकांगीपणा जाऊन सर्वसमावेशनाचा स्वभाव घडला तो कुरुंदकरांच्याच

**पिंपरी-चिंचवड येथे होत असलेल्या ८९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ साहित्यिक-समीक्षक-विचारवंत डॉ. श्रीपाल सबनीस यांची निवड झाली आहे.**

**समाजाचे साक्षेपी निरीक्षक असलेल्या डॉ. सबनीस यांची जडणघडण ही मूलतः चळवळीतून झाली आहे. चळवळीतून आणि साहित्यातून शोषित-पीडित समाजाचा आवाज बनण्याचे काम ते आजवर करत आले आहेत. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक संचितात त्यांनी महत्त्वाची भर घातली आहे. डॉ. सबनीस यांच्या व्यक्तिमत्त्वावर आणि कार्यकर्तृत्वावर प्रकाश टाकणारा लेख.**



अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे
८९वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन
पिंपरी-चिंचवड २०१६
आयोजकः डॉ. डी.वाय.पाटील विद्यापीठ, पिंपरी, पुणे
स्वागताध्यक्षः डॉ. पी. डी. पाटील

सहवासात. समाजातील खालच्या स्तराविषयी कनवळा होता, पण त्यांच्यासाठी लेखणी उचलण्याची व प्रत्यक्ष कृती करण्याची सबनीसांनी प्रेरणा घेतली ती नांदेडमध्ये पीपल्स कॉलेजमध्येच.

कॉलेजचं शिक्षण संपल्यानंतर सबनीस धुळ्याला महाविद्यालयात व्याख्याता म्हणून रुजू झाले, पण त्यांच्यातील लढवय्या गप्प बसला नव्हता. सातपुड्याच्या डोंगररांगांतून चळवळ वाढत होती. शहाद्याच्या आदिवासी चळवळीतील एक प्रमुख कार्यकर्ता म्हणून सबनीसांकडे पाहिलं जात होतं. त्यांच्यातील शाहिराला इथे वाव मिळत होता. परिवर्धा गावाशेजारच्या आमराईत दीडशे भूमिहीन शेतमजूर तरुणांचं शिविर भरलं होतं. वर्षाला तीनशे रुपयांनी सालदारी करणारे हे तरुण होते. त्यांच्या अभावग्रस्ततेला वाचा फोडण्याचं काम कॉम्रेड कुमार शिराळकर यांच्याबरोबर सबनीस करत होते. दिवसभर वैचारिक मंथन करणारे सबनीस संध्याकाळी वेगळेच असत. त्यांची बोटं डफावर नाचत होती. आदिवासी काळजांना भेदणारा टिपेचा आवाज लागला होता...

'क्रांतीची भडकली आग तरुणा जाग वेळ ही मोलाची
पाहून मुडदे नराधमांचे धार वाहू द्या रक्ताची'

दिवसभराच्या मंथनातून जेवढं साधलं नव्हतं त्याच्या कैकपट अधिक शाहीर सबनीसांनी साधलं होतं. मग ते चळवळीचा आवाजच बनले. निलंग्याचा हा गढीवाला जमीनदार मुंबईत कम्युनिस्ट नेत्यांना भेटत होता, चर्चा करत होता. मात्र, समाधान होत नव्हतं. त्यांना शहाद्याला आदिवासी पाड्यांवरच्या चळवळीत ते सापडलं.

पुढे प्रत्यक्ष चळवळीतील सहभाग कमी होत गेला तरी त्यांचं घर हे कार्यकर्त्यांसाठी स्वतःचं आपुलकीचं घर राहिलं. या लढवय्या माणसाने आणीबाणीतही जागर करण्याचं काम केलं. आदिवासी तरुणांसाठी धुळे जिल्ह्यात बॅकलॉग आंदोलन करून सुमारे तीनशे तरुणांना त्यांनी नोकरी मिळवून दिली. कार्यकर्त्याच्या भूमिकेतून ते लेखकाच्या भूमिकेत आल्यावरही त्यांच्यातील योद्धा कायम राहिला. मराठी साहित्यातील एक अभ्यासक आणि समीक्षक म्हणून वावरताना त्यांच्यातील योद्धा कायमच दिसत आला आहे. आपल्या व्यासंगाने, वैचारिक निर्भयतेने, निर्भीडपणे ते लेखन करत आले. योद्धा दुर्बळांचं रक्षण करतो आणि समाजाच्या शत्रूंवर तुटून पडतो. सबनीस आपल्या लेखणीतून हेच साधत आले. साहित्य, संस्कृती, समाजकारण, राजकारण यांची चिकित्सा करताना त्यांची तत्त्वनिष्ठा व सत्यनिष्ठा दिसते. परिवर्तनाच्या माध्यमातून विकासाची समतोल दिशा सूचित करणाऱ्या या लेखकाने एक परिवर्तनशील विचारवंत अशी ओळख प्राप्त केली आहे.

डॉ. सबनीस यांच्या लेखनाचा आवाका प्रचंड आहे. सुमारे सव्वीस पुस्तकं त्यांची वैचारिक भूमिका स्पष्ट करतात. संतसाहित्य, स्त्रीसाहित्य, दलित साहित्य, ग्रामीण साहित्य या सर्वच प्रकारांची त्यांनी प्रगल्भतेने समीक्षा केलेली आहे. त्यांचं लेखन कित्येकदा वादात सापडलेलं आहे, पण त्यांच्या भूमिकेचा अव्हेर करणं कोणालाही सहजी शक्य झालेलं नाही. त्यांच्या काही ग्रंथांची शीर्षकंच पाहा : 'ब्राह्मणी' सत्यशोधक, उगवतीचा क्रांतिसूर्य, समतोल समीक्षा, भारतरत्न आणि वहिष्कृत भारत, भारतीय प्रबोधन आणि नवआंबेडकरवाद, इहवादी संस्कृतिशोध, सुर्व्यांच्या कवितेची इहवादी समीक्षा, परिवर्तनवादी प्रवाहांची तौलनिक समीक्षा, सेक्युलरिझम प्रबोधनाचा मानदंड, आदिवासी-मुस्लिम-ख्रिश्चन साहित्य मीमांसा, संस्कृती समीक्षेची तिसरी भूमिका. या ग्रंथांतील

## डॉ. श्रीपाल सबनीस यांची ग्रंथसंपदा

१. ज्ञानेश्वर ते आंबेडकर
२. सेक्युलर वाङ्मयीन अनुबंध
३. ब्राह्मणी सत्यशोधकाचे अब्राह्मणी सौंदर्यशास्त्र
४. भारतीय प्रबोधन आणि नव-आंबेडकरवाद
५. संस्कृती समीक्षेची तिसरी भूमिका
६. सेक्युलॅरिझम : प्रबोधनाचा मानदंड
७. परिवर्तनवादी प्रवाहाची तौलनिक समीक्षा
८. साने गुरुजी विचार जागर
९. ब्राह्मणी सत्यशोधक
१०. उगवतीचा क्रांतिसूर्य
११. भारतरत्न आणि बहिष्कृत भारत
१२. नारायण सुर्व्यांच्या कवितेची इहवादी समीक्षा
१३. संत साहित्यातील सेक्युलॅरिझम
१४. समतोल समीक्षा
१५. इहवादी संस्कृतिशोध
१६. आदिवासी, मुस्लिम, ख्रिश्चन साहित्यमीमांसा
१७. तौलनिक साहित्य आणि भाषांतरमीमांसा
१८. विद्रोही अनुबंध
१९. कलासंचित
२०. वृहन्महाराष्ट्राचे वाङ्मयीन संचित

### ललित लेखन

१. मुक्तक
२. उपेक्षितांची पहाट
३. जीव रंगला रंगला

### संपादित ग्रंथ

१. फ. म. शहाजिंदे यांची निवडक कविता
२. संस्कृती स्पंदनाचा मराठी आलेख
३. महाराष्ट्राच्या इतिहासातील स्त्रियांचे योगदान
४. प्रबोधनपर्व (प्रा. विलास वाघ गौरवग्रंथ)

### नाटक

१. शुक्राची चांदणी (वगनाट्य)
२. मुंबईला घेऊन चला (वगरनाट्य)

### एकांकिका

१. सत्यकथा ८२
२. क्रांती
३. कॉलेज कॉर्नर

सैद्धांतिक नवेपण नक्कीच लक्षात घ्यावं लागतं. बुरसटलेल्या विचारांविरुद्ध त्यांनी बंड पुकारल्याचं आणि समाजाच्या विकासाला मारक ठरणाऱ्या गोष्टींशी त्यांनी दावा मांडल्याचं या ग्रंथांतून दिसतं. केवळ बंड करून ते थांबत नाहीत, तर वैचारिक प्रवाहाला गतिमान करण्यासाठी ते या ग्रंथांमधून प्रमेयात्मक मांडणी करताना दिसतात.

'तू शुक्राची चांदणी' या त्यांच्या पहिल्या वगनाट्यात सामाजिक बांधिलकीची भावना प्रकट झाली होती. उत्तरोत्तर ती अधिक समर्थपणे व्यक्त होत असताना अधिकाधिक रोखठोक बनत गेलेली आढळते. 'नवआंबेडकरवाद' आणि 'इहवादी संस्कृती' या दोन महत्त्वाच्या संकल्पना मराठी समीक्षाविचारात त्यांनी रुजवल्या. परिवर्तनवादी विचारांशी त्यांची निष्ठा आहे. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांशीही त्यांची बांधिलकी आहे. डॉ. आंबेडकर हे त्यांचं श्रद्धाकेंद्र असल्याचं त्यांच्याशी बोलताना लक्षात येतं. दलितांच्या उत्थानासाठी डॉ. आंबेडकर यांनी मांडलेले विचार आणि त्यांनी राबवलेले कृतिकार्यक्रम श्रीपाल सबनीस यांना सतत प्रेरणा देत राहिलेले दिसतात. ही प्रेरणा घेऊनच सबनीस स्वतःही त्या वाटेवरून चालत राहिले आहेत. ते वेगवेगळ्या टप्प्यांवर आपलीच आंबेडकरवादी भूमिका तपासून घेतात. त्यातून आंबेडकरवादाचा विकास नव्या दिशेने होण्यासाठी एक प्रारूप उभं करण्याचा सबनीस प्रयत्न करतात. आंबेडकरवादी चळवळीत साचलेपण आलेलं आहे. ते जाऊन, मूल्यांचा शुद्ध प्रवाह खळखळ वाहण्याच्या दृष्टीने सबनीस नवआंबेडकरवादाची संकल्पना मांडतात. मात्र, त्यावर चर्चा करून ती स्वीकारणं आंबेडकरवाद्यांना अजूनही शक्य होत नाही. मात्र, त्यांची भूमिका आता दलित चळवळ, आदिवासी-मजूर चळवळ, श्रमिक चळवळ, स्त्रीवादी चळवळ या चळवळींच्या केंद्रस्थानी उभी आहे.

'इहवादी संस्कृतिशोध' आणि 'सुर्व्यांच्या कवितेची इहवादी समीक्षा' हे दोन मला आवडणारे ग्रंथ आहेत. मानवतावादी भूमिकेतून सबनीस संस्कृतीतील इहवादी अंगाचा शोध घेत आहेत. परिवर्तनवादी प्रवाहांचाही ते मानवतावादी भूमिकेतून विचार करतात. सुर्वे यांच्या कवितेत ते वाङ्मयीन पातळीवरून इहवादी जाणिवांचा शोध घेतात. सध्या सेक्युलॅरिझमवरून उलटसुलट चर्चा सुरू आहे. सबनीस यांनी 'सेक्युलॅरिझम : प्रबोधनाचा मानदंड' या ग्रंथात सेक्युलॅरिझमची अर्थनिश्चिती करण्याचा प्रयत्न केला आहे. सर्वधर्मसमभाव, धर्मनिरपेक्षता, धर्मविरोध, धर्माचा विलय, धर्माची गरज संपणे, इहवाद अशा अनेक अवस्थांचा विचार त्यांनी केला आहे. त्याच वेळी त्यांनी 'संतसाहित्यातील सेक्युलॅरिझम'ही शोधला आहे. सबनीसांच्या विचारांच्या दिशेचं वेगळेपण इथे दिसतं.

त्यांच्या लेखनात व व्यक्तिमत्त्वात ताजेपण दिसतं. भरभरून ओसंडणारा उत्साह व सडेतोड निर्भय वृत्ती दिसते. समाजातील शोषितांची ते कड घेतात, त्यातही आंधळेपणा नसतो. शोषितांच्या बाजूने उभे राहताना त्यांची विवेकबुद्धी शाबूत असते. अंतर्बाह्य खुली आणि बेधडक अशी त्यांची वृत्ती प्रत्यक्षात आणि लेखनातही दिसते. त्यांच्या वक्तृत्वात आणि लेखनात आक्रमकता आहे. कित्येकदा ही आक्रमकता अनाठायी असते. त्यांचा अभिनिवेश त्यांना ऐकताना व पहिल्यांदा वाचताना स्तिमित करतो. पण नंतर लक्षात येतं, की सबनीसांनी मांडलेल्या महत्त्वाच्या मुद्द्यावरून आपलं लक्ष विचलित झालं आहे. अर्थात, सबनीसांना हे कधी जाणवलंच नसेल असं नाही. पण ते बदलणार नाहीत. याबाबत ते 'कडवे' आहेत. कदाचित हे त्यांचं कडवेपणच मला आणि इतरांनाही आवडत असेल. ◆

**संतोष शेणई**
चलभाष : ९८८१०९९०१६
santshenai@gmail.com



अनुक्रमणिका









भाषण

वसंत आबाजी डहाके



# कविता हे कवीचं विधान असतं...

**साहित्य अकादमीच्या वतीने अलीकडेच मुंबईत 'युवा मराठी काव्योत्सवा'चं आयोजन करण्यात आलं होतं. या काव्योत्सवात मराठीतील काही महत्त्वाचे आश्वासक युवा कवी-कवयित्री सहभागी झाले होते. या काव्योत्सवाच्या उद्घाटनाच्या सत्राचं अध्यक्षस्थान ज्येष्ठ कवी-समीक्षक वसंत आबाजी डहाके यांनी भूषवलं. या वेळी त्यांनी मांडलेले विचार इथे प्रसिद्ध करत आहोत.**

जमिनीवर रेघोट्या ओढून मानवाने आपलं म्हणणं मांडायला सुरुवात केलेली असली; आपला चेहरा, हात यांच्या साहाय्याने आपले भाव व्यक्त करायला सुरुवात केलेली असली; आपल्या सबंध शरीरातून आपल्या आनंदाचा, दु:खांचा, वेदनांचा आविष्कार करायला सुरुवात केलेली असली, तरी कविता हेच प्राचीन काळापासून मानवाच्या अभिव्यक्तीचं महत्त्वाचं माध्यम राहिलेलं आहे. कवीची शारीरिक, मानसिक आणि आत्मिक प्रस्फुरणं कवितेतून व्यक्त होत असतात अशी माझी धारणा आहे. व्यक्तिगत आणि सामाजिक पातळीवर जे सतत घडत असतं त्याविषयीच्या कवीच्या प्रतिक्रिया कवितेतून येत असतात. आपला अनुभव आणि विचार कवी मांडत असतो. कवितेला विषय नसतो तसा अ-विषयही नसतो. एखाद्या निर्झराच्या सौंदर्यापासून बॉम्बने उद्ध्वस्त झालेल्या शहरापर्यन्त सर्व काही कवितेत विचारानुभवाच्या रूपाने येत असतं. कवितेची विविध रूपं संभवतात : भावकविता, कथात्म कविता, चिंतनपर कविता, इत्यादी. कवीचा जो काही प्रत्यय असेल, विचारव्यूह असेल- विचारसरणी म्हणा, जीवनदृष्टी म्हणा- कवितेतून प्रकटत असते. कवितेची भाषा ही आपली नेहमीची बोलण्या-लिहिण्याची भाषा असते. प्रत्येक कवी आपल्या पिंडप्रकृतीप्रमाणे विविध भाषांच्या, बोलींच्या त्याच्यावर झालेल्या संस्कारांप्रमाणे भाषा आत्मसात करतो आणि तिचा वापर करतो. त्यामुळे ती पृथगात्म ठरते. उदाहरणार्थ, कोलटकरांची, चित्र्यांची, ढसाळांची भाषा.

कलांच्या इतिहासात रोमँटिक, वास्तववादी, अतिवास्तववादी इत्यादी संज्ञांचा उच्चार होतो त्या कवींच्या वृत्तिप्रवृत्ती व आविष्कारांची प्रकृती दर्शवणाऱ्या गोष्टी आहेत. स्त्री-पुरुषविषयक उत्कट प्रेम व्यक्त करणारी, निसर्गानुभवाचा प्रत्यय देणारी, प्रखर राजकीय भाष्य करणारी, सामाजिक बांधिलकी प्रकट करणारी- अशा विविध कविता एकाच काळात असू शकतात. आपल्या अवतीभवतीचं वास्तव वितळवून कवितेत त्याला रूप दिलं जातं. किंवा असंही म्हणता येईल, की कवीच्या मनात वास्तवाचं प्रतिबिंब पडतं ते तो कवितेच्या रूपात व्यक्त करतो. वास्तवाविषयी कवीच्या ज्या काही भावनिक-वैचारिक प्रतिक्रिया होतात, त्यांत त्याची विचारसरणी मिसळते आणि कवितेला आकार मिळतो, असंही सांगता येईल.

रणगाड्यांसमोर आलिंगनबद्ध युगुल हे दृश्य शक्यतेच्या कोटीतलं असू शकतं. रायफली रोखलेल्या सैनिकांसमोर फुलं पुढे करणारी मुलं हे दृश्यही संभवनीय असू शकतं. चौकात आंदोलन करणाऱ्या युवकांवर रणगाडे घालून त्यांना चिरडून टाकणारी माणसं हे दृश्यही वास्तवातलं असू शकतं. एक देश सोडून दुसऱ्या देशात आसऱ्यासाठी जाणाऱ्या कुटुंबातला लहानसा मुलगा किनाऱ्यावरच्या वाळूत उपडा पडलेला असणं. कित्येक दिवस अन्न न मिळाल्याने खंगून मरू घातलेलं बालक आणि जणू काही त्याच्या मरणाचीच वाट पाहत असलेलं गिधाड, बॉम्बच्या धगीने अंगांग पोळून गेल्याने अंगावरची वस्त्रं ओरबाडून काढून आकांत करत धावणारी कोवळी मुलं- ही सगळीच शक्यतेच्या कोटीतली दृश्यं आहेत. ज्या जगात आपण राहत आहोत त्या जगात पांढऱ्या नाजूक फुलांनी संपूर्ण बहरून गेलेलं आणि वाऱ्यावर आपला गंध उधळणारं कडुनिंबाचं झाड असतं, त्याच जगात एकाकी-असहाय माणसाची पारध



अनुक्रमणिका



करण्यासाठी सुरे, भाले घेऊन येणारी माणसंही असतात. ज्या जगात भरदिवसा जमिनीवर चांदणं पसरल्यासारखं कपाशीचं शेत असतं, त्याच जगात शेतातल्या बाभळीच्या झाडाला टांगून घेऊन आयुष्य संपवणारा कष्टकरी माणूस असतो. ज्या जगात दुथडी भरून वाहणारी महाकाय वस्तुभांडारं असतात, त्याच जगात हातातोंडाची गाठ कशी घालावी या काळजीने पोखरून गेलेले मायबाप असतात. ज्या जगात आपल्या बाळीला कडेवर घेऊन तिला चंद्रकोर दाखवणारा बाप असतो, त्याच जगात अशा असंख्य बाळ्यांसह, त्यांच्या आई-बापांसह राहत्या वस्त्या जाळून टाकणारा, कोणत्या तरी विचारसरणीच्या उन्मादाने हिंस्र झालेला जमावही असतो. व्यक्तीचं आणि लोकसमूहाचं कोसळणं, एखादा समाज झपाट्याने ऱ्हासाकडे चाललेला असणं, तुमच्या प्रत्येक हालचालीवर बिग ब्रदरने लावलेल्या सीसी टीव्हीची नजर असणं, श्वास घुसमटून टाकणारं राजकीय-सांस्कृतिक पर्यावरण असणं- ही सगळीच शक्यतेच्या कोटीतली दृश्यं आहेत आणि कवितेत ती या ना त्या रूपात पुन:पुन्हा येत राहतात.

कविता हे कवीचं विधान असतं. ते ठाम उच्चारातलं असू शकतं तसंच भयग्रस्त मानसिक अवस्थेतून निघालेलं असू शकतं. यात डावं-उजवं मी करत नाही. पराकोटीचं नैराश्यही व्यक्त होत असतं. मानवसमाजाच्या इतिहासात अशी स्थिती पुन:पुन्हा येत असते, ज्या वेळी कवींना विरोध-प्रतिरोध करावा लागतो. सबंध मराठी साहित्याचा इतिहास पाहिला तर तो प्रतिरोधात्मक साहित्याचा इतिहास आहे. हा प्रतिरोध मराठी भाषेच्या उपयोगाच्या संदर्भात असेल, जनसामान्यांपर्यन्त खरं धर्मज्ञान पोचवण्याच्या संदर्भात असेल, समाजातील अनिष्ट चालीरीती आणि रूढी यांच्या संदर्भात असेल, समाजातील आर्थिक आणि सामाजिक विषमतेच्या आणि पिळवणुकीच्या संदर्भात असेल, जागतिकीकरणाच्या विपरीत परिणामांच्या संदर्भात असेल वा राजकीय-सामाजिक नियंत्रणांच्या संदर्भात असेल- मराठी साहित्याची उत्पत्तीच मुळात प्रतिरोधातून झालेली आहे हे दिसेल. मात्र, प्रतिरोध आहे तर रचनात्मकताही आहे. त्या दोहोंमधलं द्वंद्वही आहे.

आजच्या युवा कवींच्या कवितेत या तिन्ही गोष्टी आढळतात.

तटस्थ कुंपणावरून मी उतरायला हवं आता.
गोळ्यांची संख्या अपुरी होत होत त्या संपूनच जातील
एवढी मस्तकांची संख्या वाढवायला हवीय.

बालाजी सुतार यांच्या या ओळींतून प्रतिरोधच व्यक्त झालेला आहे. त्यांच्याच दुसऱ्या एका कवितेत प्रतिरोध आणि रचनात्मकता यांच्यातील द्वंद्वात्मक ताण व्यक्त झालेला आहे. सध्याच्या अनेक कवींनी कृषिजन जीवनातील विविध ताणतणाव, विरोध व्यक्त केलेले आहेत. काही ओळी पाहा :

असा धुमसता आसमंत
एका बाजूला अन्
नांगरट घालणारा जिद्दी बाप
दुसरीकडे.
उभे राहतात आमने-सामने,
ठामपणे, दरसाल.

सत्यपालसिंग राजपूत यांच्या एका कवितेत संस्कृतीच्या इतिहासाचं भान आल्यानंतरचा, संस्कृतीच्या जयजयकाराआड दाबले गेलेले हुंदके ऐकू आल्यानंतरचा हा प्रतिरोध पाहा :

ही वर्चस्वी पुरुषसत्ता
हजारो वर्षांपासून वाहत आलेली माझ्या जनुकांतून
कधी जागी झालीच
तर उपस माझ्या म्यानातील तलवार
अन् माझ्यातल्या वर्चस्वी पुरुषाचे
बिनधास्त छाटून टाक मुंडके.

आपल्या कवितेला मॅगझिनमधून सुटणाऱ्या गोळीच्या समकक्ष ठेवणाऱ्या बालिका ज्ञानदेव यांनी प्रतिरोधात्मक प्रश्न थेट विचारला आहे :

बायांनो, अजून किती पिढ्या
जोपासणार आहोत आपण
ही मौनाची परंपरा ?

'बायांनो' या शब्दाच्या जागी 'कवींनो', 'बुद्धिजीवींनो' असे शब्दही टाकता येतील! त्यांच्या विविध कवितांतून लिंगभेदावर आधारित शोषणाविरुद्ध तीक्ष्ण प्रतिक्रिया व्यक्त झाली आहे.

रचनात्मकताच नव्हे तर प्रतिरोध करणंही अशक्य होऊन जावं अशीही स्थिती येत असते. वीरा राठोड यांच्या 'किती भयाण अंधारून आलंय बघ' या कवितेतून ही स्थिती व्यक्त झाली आहे. ही स्थिती स्वत:ला खचवणारी, असहाय करणारी असते. सतत धास्ती, भीती जाणवत राहते, आपल्या अकर्मण्यतेचा बोध होत राहतो. कवीला भोवताली मुक्या गर्दीचे प्रचंड लोट दिसताहेत. भीतीपोटी माणसं सैरावैरा पांगलेली आहेत. भोवताली 'रामनाम सत्. है'चा प्रचंड जयघोष चाललेला असतो. या झुंडीत जगायचं म्हटल्यावर आपल्यालाही नाइलाजास्तव 'रामनाम सत् है' म्हणावं लागतं. नाही तरी आपण भाकरीचे गुलामच असतो. या कवितेतील काही ओळी पाहा :

रोजीरोटीच्या तुकड्याखातर
गांधारी होऊन जगतो
कशाचाही राहिला नाही भरवसा.

आता हीच कविता शेवटच्या दोन ओळींमुळे चांगल्या प्रेमकवितेच्या पातळीवर कशी पोचते ते पाहा : कवीने म्हटलेलं आहे :

तुझा हात तेवढा विश्वासाचा उरलाय
बाकी भयाण अंधारून आलंय बघ.



**कविता हे कवीचं विधान असतं. ते ठाम उच्चारातलं असू शकतं तसंच भयग्रस्त मानसिक अवस्थेतून निघालेलं असू शकतं. यात डावं-उजवं मी करत नाही. पराकोटीचं नैराश्यही व्यक्त होत असतं. मानवसमाजाच्या इतिहासात अशी स्थिती पुन:पुन्हा येत असते, ज्या वेळी कवींना विरोध-प्रतिरोध करावा लागतो. सबंध मराठी साहित्याचा इतिहास पाहिला तर तो प्रतिरोधात्मक साहित्याचा इतिहास आहे.**

या विश्वासाच्या हातामुळे प्रतिरोध शक्य आहे, आणि रचनात्मकतादेखील. कवीला याची जाणीव झालेली आहे.

रचनात्मकता आणि प्रतिरोध यांच्यातलं द्वंद्व अतिशय तीव्र झालेलं आहे हे आपल्याला कल्पना दुधाळ यांच्या विविध कवितांतून पाहायला मिळतं. त्यांच्या एका कवितेत म्हटलेलं आहे :

स्वत:कडं न बघता आम्ही नागवेच नाचत आलोय
व्यवस्थेनं उपसलं पाणी, आम्ही विहिरीचा गाळ झालोय
आता मात्र याच गाळातून विद्रोहाची नदी वाहील
पाटातून पाणी नव्हे, खळखळत रक्त जाईल.

एखादी कविता अनेक पातळ्यांवर कशी फिरते आणि आपल्या आत असलेली प्रतिरोधात्मकता कशी व्यक्त करते हे त्यांच्या 'पोकळी' या कवितेत दिसतं. 'घरातल्या प्रत्येकाचं गोळ्या-औषधांचं पुडकं वेगळं असतं, तसंच शेतातल्या प्रत्येक पिकाचंही खत, औषध फवारणं वेगळं असतं, अशा साध्या ओळींनी सुरुवात झालेल्या या कवितेतल्या शेवटच्या दोन ओळी इथे देतो :

माझ्या फुफ्फुसांत जंतुसंसर्ग होण्याआधी
साऱ्या विश्वालाच पेस्ट कंट्रोल करायला निघालेय मी.

आपल्या फुफ्फुसांत जंतुसंसर्ग होणं टाळणं आपल्याला या वर्तमानात खरोखरच शक्य आहे का, हा या कवितेबाहेरचा प्रश्न आहे, पण तो विचारावासा वाटतो. कदाचित हा प्रश्न एखाद्या कवितेच्या आतलाही असू शकेल. पृथ्वीराज तौर यांच्या ही 'खेडी उदास उदास' या कवितेत गोदाकाठच्या उदास खेड्यांचं चित्र आलेलं आहे. शेतं उद्ध्वस्त-उजाड झालेली आहेत आणि माणसं चौकाचौकांतून बुजगावण्यासारखी बसलेली आहेत. या कवितेतून कवीने एक अधिक भयावह इशारा दिलेला आहे :

गोदाकाठच्या खेड्यांनो,
माती सरकत आहे मुळापासून
सांभाळा ! स्वत:ला सांभाळा
नाही तरी हिरोशिमा दूर नाहीच.

आजच्या प्रगत व्यापारी-औद्योगिक संस्कृतीत माणसांची मुळंच उखडली जात आहेत. ती कोणत्याही कारणाशिवाय, इच्छा नसताना लढताहेत आणि का, कुणासाठी हे त्यांना ठाऊक नाही. अशा स्थितीत गाव म्हणून जे काही आहे ते शिल्लक राहील काय, असा प्रश्न कवीला पडतो.

इग्नेशिअस डायस यांनी एक दु:स्वप्न पाहिलेलं आहे : गावाच्या नाहीसं होत जाण्याच्या केवळ खाणाखुणा मागे राहिलेल्या आहेत. शहर आणि गाव यांना वेगळं करणारी एक अस्पष्ट अशी सीमारेषा आहे. ती धूसर होत जाईल आणि तिच्यासोबत गावही जगाच्या नकाशावरून नाहीसं होईल. ते म्हणतात :

आता हजारो वर्षांनंतरच्या उत्खननात
सापडेल एखादा सांगाडा गावाचा
गावाच्या अस्तित्वाचा पुरावा म्हणून
जो ठेवता येईल
पुरातत्त्व विभागाच्या म्युझियममध्ये सुरक्षित.

आजच्या या युवा कवींच्या काळजात कोणत्या वेदनेने ठाण मांडलेलं आहे याचा शोध घेतला तर प्रश्नांचं, चिंता-काळज्यांचं, आस्थांचं एक कोलाजच पाहायला मिळतं. फेलिक्स डिसोझा यांच्या एका कवितेत म्हटलेलं आहे :

नि:शब्दतेचा आजार जडलाय
नि पसरलाय रोग साथीसारखा.

माणसं कुठल्याही भाषेतला कुठलाच शब्द कुणीच कुणाशी उच्चारत नाहीत अशी स्थिती आहे. माणसं एकमेकांपासून दूर गेलेली आहेत, नात्यांचं विघटन होत चाललेलं आहे याचं कवीला दु:ख आहे. ऐश्वर्य पाटेकर यांच्या 'हरिपाठ' या कवितेत गावातली माणसं कशी एकाकी-एकटी झालेली आहेत याचं अस्वस्थ करणारं चित्रण आलेलं आहे. गावात नुसती भुतं उरलेली आहेत, जिती माणसं गेली बा कुठं, असा प्रश्न कवीला पडलेला आहे. गाव धूसर होत जाण्याची चिंता रवी कोरडे यांच्या कवितेतही दिसते. विनायक येवले यांनी हरवलेल्या गावास अनावृत पत्र लिहिलेलं आहे. आता कुठल्याच अंगणात ओलावा जाणवत नाही. नात्यागोत्यांना स्वार्थांची चरबी चढली आहे. आताचा गाव राजकारणाच्या तिरडीवर बांधला गेला आहे. जिकडे-तिकडे राजकीय पक्षांच्या पाट्या लागल्या आहेत. गावसंस्कृतीच्या बखरी इतिहासजमा झाल्या आहेत. गाव विध्वंसखोर लांडग्यांचा झालेला असून माणुसकीला पारखे झालेल्या हतभाग्यांचा बनलेला आहे. सगळं संपलं. मागे मागे जाणारी आठवणींची धूसर पायवाट तेवढीच शिल्लक राहिली- पूर्वीचा गाव शोधण्यासाठी.



अनुक्रमणिका

आजच्या औद्योगिक-व्यापारी-राजकीय संस्कृतीत हरवून गेलेल्या गावाविषयीची कवीची व्यथा प्रातिनिधिक आहे.

आजच्या काही युवा कवींच्या कविता वाचताना जाणवलेला एक कोन इथे मांडलेला आहे. आणखीही इतर कोनांतून या कवितांकडे पाहता येईल. इथे निमंत्रित कवींखेरीज कवितेविषयी आश्वस्त करणारे आणखीही काही कवी आहेत याची मला जाणीव आहे. मराठी कवितेच्या रसिकांनी त्यांची कविता वाचावी यासाठी इथे काही नावं देत आहे : प्रणव सखदेव, प्रेषित सिद्धभट्टी, प्रमोदकुमार अणेराव, प्रशांत असनारे, मोहन कुंभार, विनोद कुमरे, अभय दाणी, गोविंद काजरेकर, बालाजी मदन इंगळे, अनिल धाकू कांबळी, कैलास दौंड, केशव खटिंग, भरत दौंडकर, गणेश मरकड.

शंकरराव दिघे यांच्या 'या शतकाचा सात-बाराच होईल कोरा...' या दीर्घकवितेत खेडी, ग्रामीण परिसर, तिथली माणसं, समाज, मूल्य-ऱ्हास यांचं विदारक चित्रण केलेलं आहे. लोकशाही- काही तांत्रिकांच्या प्लँचेटवर उतरणारा हुकमी आत्मा, या शब्दांत कवीने लोकशाहीचं वर्णन केलं आहे. जागतिकीकरण, उदारीकरण, खासगीकरण यांतून आलेलं बाजारपेठेचं तत्त्वज्ञान; लोकशाहीच्या नावाने चाललेला राजकीय धुमाकूळ, शेतकऱ्यांची विपन्नावस्था, मीडियाची आतषबाजी अशा अनेक गोष्टी आणि खेड्यांची, समाजाची, त्यातल्या असंख्य सामान्य माणसांची होत असलेली धूळधाण या कवितेत चित्रित झालेली आहे. एकनाथ पाटील यांनीही (खुंट्यांवर टांगलेली दु:खं ) म्हटलेलं आहे : शहर घुसत गेले खोलवर गावाच्या आत/ साऱ्या ताकदीनिशी गावाला करता आली नाही त्याच्या अतिक्रमणावर मात. गावात बोकाळलेल्या राजकारणाविषयी त्यांनी म्हटलं आहे : आता गाव अनेक झेंडे, राजकीय पक्ष, गटातटांत विभागलेला/ माणूस माणुसकीसह स्वत:पासूनच तुटलेला. गोविंद काजरेकर (उरल्यासुरल्या जगण्याचं रीमिक्स) यांनाही गावरहाटी बिघडत चालल्याचं जाणवतं आणि ती सावरण्यासाठी कुणीही पुढे सरसावत नाही हे दिसतं. राजसत्तांच्या कुडी फक्त बदलत गेल्या, परंतु मूलभूत पालट असा घडत नाही. गावात घुसलेल्या राजकारणाविषयी बालाजी मदन इंगळे (मेलं नाही अजून आभाळ...) यांनीही विषाद व्यक्त केला आहे. इंगळे यांनी शेतकऱ्यांची दैनाही अनेक कवितांतून सांगितली आहे. शेतकऱ्यांचं आत्महत्या करण्याचं स्वातंत्र्य अद्याप हिरावून न घेतल्याबद्दल कवीने सरकार, सावकार आणि देश यांचे आभार मानले आहेत. माणसे होती इथे; त्या माणसांचे काय झाले/ फाटक्या त्या माणसांचे काय झाले, असा प्रश्न अनिल धाकू कांबळी (किलकिल्या उजेडाची तिरीप) यांनाही पडलेला आहे. गावाच्या, शेतकऱ्यांच्या, कुणब्यांच्या व्यथा-वेदना कैलास दौंड यांच्या (अंधाराचा गाव माझा ) कवितांतून व्यक्त झाला आहेत. कुणबिकीवर, शेतकऱ्यांवर, गावांवर कोसळत असलेल्या नव्या संकटांची झळही नव्या कवींच्या कवितांतून दिसते. केशव खटिंग (सालोसाल) यांच्या कवितेत भूमिसंपादन हे अलीकडच्या काळातलं घटित आलेलं आहे. तुम्ही वावर घेताय, म्हणजे नुस्तं वावर घेताय का ? वावर म्हणजे नुस्ती जमीन, नुस्ती लँड नाही हो सरकार. माझ्या कित्येक पिढ्यांचा भूगोलय, इतिहासय... सगळी शास्त्रं, पुराणं सगळं सगळंय हो, असा आक्रोश शेतकरी करत आहेत. खेडी बदलत चालली आहेत, अधिकाधिक उद्ध्वस्त होत चालली आहेत, हे निरीक्षण अनेक कवींनी नोंदलेलं आहे. शेतकऱ्यांच्या पाठीवर सरकारी पराणीचा टोच असतो आणि तो आपल्याच पोटावर शहरांच्या खुरांचा भार सहन करतो, असं भरत दौंडकर (गोफणीतून निसटलेला दगड, २०१२) म्हणतात. कृषी जनजीवन विस्कळीत होतं आहे, मोडून पडतं आहे, हे या कवितांमधील कथनांतून आपल्या प्रत्ययाला येतं. ग्रामीण परिसरावर, कृषी जनजीवनावर चौफेर आघात होत आहेत हे अनेक कवींच्या कवितांमधून आपल्याला दिसतं.

या सर्वच संहिता संहितांच्या बाहेर असलेल्या संहितांकडे- वास्तवाकडे, समाजाकडे, जनजीवनाकडे, राजकीय-सामाजिक-आर्थिक घडामोडींकडे पाहायला लावतात. त्यांत बाहेरच्या जगातले निर्देश असतात. कोणत्याही साहित्यकृतीचं हेच काम असतं. ती साहित्यकृती वाचकांनी तिच्यातच गुंतून राहावं अशी अपेक्षा करत नाही, तर तिच्यातून बाहेरच्या मोठ्या व्यापक अवकाशाकडे बघावं असं सुचवते. दुसऱ्या भाषेत, आपण या कविता वाचत असताना आपला समाज वाचत असतो. या समाजाला कसल्या व्याधी झालेल्या आहेत, त्यांची कोणती लक्षणं दिसताहेत तेच वाचत असतो. या कविता म्हणजे व्याधिग्रस्त समाजाचे केसपेपर्स आहेत, असंही म्हणता येईल. ही कविता ग्रामीण परिसराविषयी, शेतकऱ्यांविषयी, कुणबिकीविषयी काही सांगत असली तरी ती ग्रामीण कविता नाही. आधुनिकीकरणाच्या पुढल्या टप्प्यातल्या जागतिकीकरणाने झळंबलेलं ग्रामजीवन इथे आहे. गाव आणि शहर यांतली दरी बुजावी, त्यावर पूल बांधला जावा. पण या पुलावरून शहर गावात आक्रमकपणे घुसतं आहे आणि ग्रामजीवनाचा, कृषिजनमूल्यांचा स्वाहाकार करीत आहे, ही जाणीव झालेल्या कवींनी लिहिलेली ही कविता आहे.

कविता लिहिण्याच्या, किंबहुना काहीही लिहिण्याच्या दृष्टीने आताचा काळ खडतर आहे. तरीदेखील युवा मराठी कवी लिहिताहेत, प्रतिरोध करताहेत, नव्या रचना करताहेत, ही आशादायक गोष्ट आहे. अभिव्यक्तीची जोखीम तर कोणत्याही काळात असतेच.

◆

**वसंत आबाजी डहाके**
चलभाष : ९८९०३६२७०३
vasantdahake@gmail.com



# लेख

गंगाधर पानतावणे

भारत आणि भारतधर्म हा नेहमीच विवाद्य विषय राहिलेला आहे. प्राचीनतेचा सोस तर भारतीय माणसाला अधिक आहे. शतावधी वर्षे आम्ही जगलो ते 'अध्यात्मतेजोवले' हा गंड तर अक्षय आहे. आजच्या भारतीय माणसाचे आणि भारतधर्माचे मर्मभेदी असे चित्र कवी विश्वास वसेकरांनी त्यांच्या 'तरी, आम्ही मतदारराजे' या कवितासंग्रहात रेखाटले आहे. मर्मभेद करताना ते औपरोधिकतेचा सहज-सुंदर आश्रय घेतात. भारतात जन्मणे दुर्लभ आहे. ही आत्मगौरवाची भाषा आज कितपत वस्तुनिष्ठ आहे? म्हणूनच कविमनाला सतत भेडसावते, की या देशाने मला काय दिले?

*या देशानं मला एक सहनशीलता, सहिष्णुता,*
*एक भेकडपणा दिलाय*
*कोणी कोणावर वा माझ्यावर*
*कितीही जुलूम करा,*
*मी भांडायला नाही उठत. (पृ. ८०)*

तेजस्विता नि ओजस्विता अस्तंगत झाली की माणसे निष्प्राण होतात, पराभूत होतात, पलायनवादी होतात. तरीही भारतीय माणसाचा धार्मिक पीळ हरपत नाही; तो उसळून येतोच येतो. मूलतत्त्ववाद आणि प्रागतिकता, धर्मनिरपेक्षता आणि धर्मांधता यातील संघर्ष संपत नाही. समाजव्यवस्थेचे तरी काय? भारतीयत्व बासनात टाकणारे जातीयतेचे इमले, जातीय अहंकार, धर्मांधतेची परिसीमा भारतीयत्वाला गिळंकृत करत नाही का? कवी वसेकरांचे या संदर्भातील भाष्य किती विदारक आहे!..

*या गलिच्छ धर्मांधांच्या देशात*
*विसाव्या शतकातला मी*
*कुढत जगणार, कुजून मरणार*
*...*
*माझ्या प्रार्थनास्थळाजवळून*
*मोठ्याने वाद्ये वाजवीत जाणाऱ्यांवर*
*मी दगडफेक करतो*
*माझ्या प्रार्थना मात्र*
*कानठळ्या बसविणाऱ्या दूरध्वनिक्षेपकावरून*
*साखरझोप कटू करत*
*सर्वांनीच ऐकल्या पाहिजेत. (पृ. ४८)*

आपापल्या धर्मांच्या राहुट्या सांभाळत माणसे या देशात कोणते भारतीयत्व जपत आहेत, हा कवीचा सवाल आहे. हे खरेच आहे, की आपल्या देशाइतकी धर्मांधता अन्यत्र क्वचितच असेल. धर्मनिरपेक्षतेचे तरी काय? कवी म्हणतो, की रामभक्त काय नि धर्मनिरपेक्षतेचे पूजक काय, दोहोंचेही मनसुबे आणि गणिते तयार असतात. मरण मात्र सामान्य निरुपद्रवी लोकांच्या वाट्याला येते. वसेकर म्हणतात ते वस्तुनिष्ठ आहे, की 'आम्ही मूर्ख बनतो, कठपुतळ्या होतो. या दोन्ही दुष्प्रवृत्तींनी देश 'गिनीपिग' करून टाकला आहे.' अंतःस्थ व्यथा व्यक्त करताना कवी एका कराल सत्यावर प्रकाश टाकतो,

*बाकी कर्मठ तेव्हाही नव्हतो*
*आताही नाही*
*तेव्हा मुसलमान म्हणून फरफट झाली*




कवी विश्वास वसेकर यांचा 'तरी आम्ही मतदारराजे' हा कवितासंग्रह अलीकडेच प्रसिद्ध झाला आहे. या संग्रहावर मार्मिक भाष्य करणारा ज्येष्ठ समीक्षक डॉ. गंगाधर पानतावणे यांचा लेख.

**तरी, आम्ही मतदारराजे प्रभावी राजकीय व सामाजिक आशय व्यक्त करणारी कविता**

*आता हिंदू म्हणून वैतागतो.* (पृ. ६८)

कधी काळी एकाच भौगोलिक पर्यावरणात असणारे दोन देश जेव्हा धर्मशक्तीने विभाजित होतात तेव्हा त्यांचे मानसिक दृढीकरण कसे होते याचे मार्मिक दर्शन वसेकरांनी घडविले आहे. भारतीय सैनिक पाकिस्तानविरुद्ध लढत असताना, किंवा माझ्या देशातील क्रिकेट संघ पाकिस्तानला लोळवतो तेव्हा मनात उसळणारा आनंद क्रीडाप्रेमातून जन्मत नाही. पाकिस्तान विश्वचषक हरला की मला आनंदाचे भरते येते. आनंद इतका, की ढीगभर फटाके कारगिलच्या रणभूमीत नेऊन फोडावेत. दोन देश वेगळे असले तरी धार्मिक नाळ पराकोटीच्या विद्वेषाला बांधली जाते. मानवी स्खलनाचा हा लेखाजोखाच.

भारतीय मध्यमवर्गीय माणूस कणाहीन असतो, असे नेहमीच म्हटले जाते. या आत्मकोषात हरवलेल्या माणसाची किती तरी चित्रे वसेकरांनी रेखांकित केली आहेत. कवी शरच्चंद्र मुक्तिबोधांनी मध्यमवर्गीय माणसाला कीटकसदृश म्हटले आहे आणि त्याच्या आगतिकतेची कीवही केली आहे. वसेकरांनी तर 'आवर्तात जगणारा माणूस' अशी संभावना केली आहे. त्याची दैनंदिनी हा त्याच्या हतवलतेचा खेळच असतो. मध्यमवर्गीयाला सतत वाटत राहते, की 'दिवसभर माझ्या पाठीतं पिस्तुल खुपसले आहे.' महागाई भत्ता वाढल्याची बातमी नसेल तर त्याला वर्तमानपत्र अळणी वाटते. क्रूर हत्याकांड, विषबाधा, विमान-रेल्वे दुर्घटना, मृत्यू या बातम्यांत त्याला रस नसतो. कौटुंबिक तोंडमिळवणीने तो बेजार होतो. सतत भयाच्या सावलीत वावरणारा हा माणूस ऑफिसात साहेबांसमोर गर्भगळित होतो आणि ऑफिसबाहेर पडल्यावर मात्र त्याला हायसे वाटते. नवे जीवन लाभल्याचा परम हर्ष होतो. शेवटी मध्यमवर्गीय असहाय माणूस हा समाजव्यस्थेचा अतूट असा घटकच आहे.

खरे तर माणसाची 'भूक' अमर आहे. भुकेसाठी वणवण फिरणाऱ्या, हिंसाचार करणाऱ्या, अगतिक व लाचार बनलेल्या माणसांना अण्णा भाऊ साठे यांच्यासारख्या थोर कथाकाराने आपल्या कथांतून सजीव केले आहे. वसेकरांनी तर 'भुके'ला 'आदिमाय' म्हटले आहे. क्षुधाक्लान्त माणसे त्यांना अवतीभवतीच भेटतात. मग तो शनीच्या नावाने हातात तांब्या घेऊन फिरणारा मुलगा असेल, अंबाबाईचा जोगवा मागणारी बाई असेल, देवीचे चित्र लटकवून धाक दाखविणारी किंवा विटलेल्या अन्नासाठी गोठाभर शेण काढणारी, किंवा शिळ्या भाकरीवर दुरड्या-बोऱ्या विकणारी किंवा निंदण-खुरपण पुरत नाही म्हणून तुरीच्या पाट्याला अब्रू विकणारी बाई असेल, रेल्वेच्या डब्यातील भिकारी हात असतील, बेठबिगारी करणारी माणसं असतील, ही सारी सारी याच देशात जन्मलेली. हा माणसांचा प्रचंड कॅनव्हास म्हणजे जगण्यासाठी पसरलेले हातच. हे कठोर सत्य प्रदर्शित करताना एक विरोधही दर्शवितात. इकबालच्या 'सारे जहाँ से अच्छा हिंदोस्ता हमारा' या एकीकडे भारतगौरवाच्या ओळी, तर दुसरीकडे साहिर लुधियानवीची 'रहनेको घर नहीं है।' ही ओळ म्हणजे भारताचे पोस्टमॉर्टेमच.

खरोखर इतिहासाला समाजाचे शास्त्र म्हणता येईल का? तसे असेल तर मग जातिसंस्थांची न पुसली जाणारी वास्तवता कशी नाकारता येईल? हे एक प्रकारे क्रूर असे मानवी विभाजनच आहे. वसेकर त्यास भंपकपणा म्हणतात. तो नुसता भंपकपणा नाही तर ते अधःपतन आहे. दास्य आणि उच्चनीचता यांना दिलेले ते 'सँक्शन', मान्यता आहे. ही विषवल्ली सर्व काळी जिवंत आहे. कवी वसेकर या विषाक्ततेच्या मुळाशी जाण्याचा साक्षेप करतात आणि भारतीय मानसिकतेचे नागडे दर्शन घडवितात.

*तुम्ही काळाराम मंदिरात प्रवेश करू पाहिला*
*तेव्हा आम्ही दगड मारले*
*तुम्ही महाडचे चवदार तळे बाटविण्याचा प्रयत्न केला*
*तेव्हा आम्ही डोकी फोडली.*
*तुम्ही विद्यापीठाचे नाव बदलू पाहिले*
*तेव्हा आम्ही तुमची घरे पेटविली.* (पृ. ४७)

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, म. गांधींनी I have no homeland असे का म्हटले असेल याचे उत्तर उपरिनिर्दिष्ट दाहक अभिव्यक्तीतून प्रत्ययाला येते.

अर्थ असा, की पोथीनिष्ठा, विषमता, वर्णवाद, भोंगळ संस्कृतिरक्षण, धर्मदास्य अजून आहे तेथेच आहे. आणि हे समाजाचे इतिहासशास्त्र आहे. सांस्कृतिक हुकूमशाहीचा हा जाहीरनामा आहे. हा जाहीरनामा म्हणजे सुधारण्याची शक्यता नसलेला 'ब्रह्मराक्षस' आहे. संविधानाने 'न्याया'ला महत्त्वाचे स्थान दिले आहे. कारण या देशात अन्यायालाच न्याय संबोधण्याचा परिपाठ आहे. कवी वसेकर न्याय संकल्पनेचा आग्रह धरतात, हे प्रशंसनीय आहे. 'डॉ. नेल्सन मंडेला सर' ही कविता त्या दृष्टीने लक्षात घ्यावी लागते. डॉ. मंडेला हे सामाजिक न्यायासाठी लढणाऱ्या संघर्षाचे नाव आहे. ज्या दिवशी मंडेलांचे पाय फुले-आंबेडकरांच्या अंगणाला लागले तो दिवसच न्यायवर्षाचा होता, असे कवी प्रतिपादन करतो, आणि ते यथार्थ आहे. परंतु फुले-आंबेडकरांच्या देशात एकदाच आलेल्या मंडेलांना 'आमच्या देशाचंही काही तरी बघा, काही तरी कराच डॉ. मंडेला सर' हे आर्जव सामाजिक न्याय व परिवर्तनाच्या संदर्भात समुचित असले तरी ते व्यवहार्य नाही. परिवर्तननिष्ठ विचार म्हणूनच त्याकडे पाहता येईल.

मराठीत राजकीय कविता अत्यल्प आहे. राजकीय मूल्यात्मकतेपेक्षा राजकीय व्यक्ती लक्ष्य करून विडंबनाकडे झुकणारी बरीचशी कविता आहे. त्यामुळे राजकीय व्यंग दुर्लक्षित होऊन केवळ विनोदनिर्मिती आणि हास्यस्फोट हाच उद्देश उरतो. वस्तुतः सत्ता, सत्ताकांक्षा आणि त्यासाठी निर्माण केलेली व्यवस्था यांचे व्यंगदर्शन हे राजकीय कवितेचे अंगभूत सामर्थ्य आहे. व्यवस्था अस्वीकृत करणे एवढेच राजकीय कवितेचे उद्दिष्ट नसते, तर त्याविरुद्धचा विद्रोह अभिप्रेत असतो.



अनुक्रमणिका

सत्तेचा संदर्भ प्राधान्याने राजकीय तर आहेच, परंतु त्याच्याशी निगडित असे अर्थ, समाज, धर्म, शिक्षण या सत्तांचाही संदर्भ अपरिहार्य असतो. पुष्कळदा राजकीय विचारावर कविता न लिहिताही ती 'राजनैतिक' कविता म्हणून उल्लेखिली जाते. नामदेव ढसाळ यांनी मात्र 'मूर्ख म्हाताऱ्याने डोंगर हलविला' या संग्रहाच्या भूमिकेत म्हटले आहे, की 'माझ्या कवितेत कविता आणि राजकारण या दोन परस्पर भिन्न अशा गोष्टी राहिलेल्या नाहीत.' वसेकरांच्या राजकीय कवितेत समकालीन राजकारणाचे संदर्भ तर येतातच, पण त्यामागोमाग भ्रष्टाचार, स्वार्थांधता, जातीय चक्र, सत्तालोलुपता, धर्म, हिंसा, भांडवलशाही हे घटक उपहासाच्या अंगाने येतात. सत्ता कोणतीही असो, तिच्यावर आपले नियंत्रण असावे, असे राजकीय मनसुबे असतात. तेव्हा सारेच कसे अंधारून येते, अशी खंत वसेकरांनी व्यक्त केली आहे. पुढे ते परखडपणे म्हणतात, की राजकारण्यांच्या रक्तात धर्म नि जातीयता असते. काहींच्या मेंदूत गांधी असतो तर काहींना साम्यवादाची ॲलर्जी असते. उजवा विचारसुद्धा कॅन्सरसारखा वळावत जातो.

राजकारण आणि राजकारणी यांचे चारित्र्य आणि चरित्र वसेकरांनी कठोरपणे लक्ष्य केले आहे. राजकारणी, मग तो कोणत्याही विचारसरणीचा असो- त्याचे ईप्सित आणि मुक्कामाचा मार्ग महत्त्वाकांक्षेच्याच मैदानातून जातो, असे कवी निभ्रांतपणे विशद करतो. कारण राजकारण्याला आपण कुणाचे आणि कसे शोषण करतो याचे भान राहत नाही. अर्थात याला फार थोडे अपवाद आहेत, हे नाकारता येत नाही. राजकारण्यांची महत्त्वाकांक्षा कैकदा क्रूरता आणि असभ्यतेचे बोट धरून वाट चालत राहते. सत्तालालसेचे प्रतीक, एका अपक्ष राजकारण्यावर शरसंधान करताना कवी वसेकर म्हणतात, की ना त्याला विचारसरणी ना निष्ठा ना जाहीरनामा, ना व्हिप ना पक्ष ना पक्षांतरबंदी कायदा. फक्त लाभ तेवढा दृष्टिपथात. 'गोड गोड लोकशाही मुळासकट खाण्यासाठी' त्याची पराकाष्टा असते.

*आधी कमिटीवर तयार होऊ*
*लगोलग एखादे महामंडळ घेऊ*
*नंतर मागणी राज्यमंत्रिपदाची*
*शेवटी कॅबिनेटसाठी धमकी देऊ. (पृ. ७२)*

सत्तेचा अनिर्बंध हपाप हेच खरे राजकीय तत्त्वज्ञान मांडणारे कधी कधी बंडखोरीचीही भाषा वापरतात.

'पंतप्रधानांचे जयललितास पत्र' ही एक खुसखुशीत व्यंगकविता. पंतप्रधान सत्तेत आल्यानंतरच्या त्यांच्या व्यथा कसकशा संभवू शकतात याचे मार्मिक चित्र या कवितेत आहे. ही कविता वाचताना सहजच नारायण सुर्वे यांच्या एका पत्रात्मक कवितेची आठवण होते, पण ती क्षणभरच. कारण वसेकरांच्या या कवितेचा बाज काही न्याराच आहे. वेगळाल्या प्रसंगी आपण काय काय करावे अशी विचारणा पंतप्रधान राजकारणी जयललिताला करतात, ही कल्पनाच बेफाम आहे.



तरी, आम्ही मतदारराजे
विश्वास वसेकर
चपराक प्रकाशन
पृष्ठे : १०४
मूल्य : १०० रुपये

*नाना नमुने गोळा करून म्या धकवतोय कसा तरी*
*परतेकाला लूट पायजे पुढारी का पेंढारी*
*लुटू देऊ का खुर्चीतून हटू, काय ते पत्रात लिवा।।*
*कोणा नेत्यानं कळविलं मी तुमच्या पिच्छावर*
*किंतु जर तुमच्या मनात आला तर थांबवीन सरकार*
*सी.बी.आय.लाच ठेवू की नकू, काय ते पत्रात लिवा।।*
*कुठून निघती कावेरी अन् ती जातीया कुठवर?*
*मधल्या राज्यांना सांगा कसा मी गायब करणार?*
*नदी वाहू देऊ का नकू, काय ते पत्रात लिवा।।* (पृ. ७३)

पंतप्रधानांच्या निमित्ताने कवी वसेकरांनी राजकीय असहायता आणि अहंता यांचे भेदक चित्र रेखाटले आहे. 'नगरसेवक' या कवितेत तर राजकारण्याचा वेलगाम उन्मत्तपणा वेशीवर टांगला आहे. जागरूक नागरिकांनी एका नगरसेवकाला निवडून दिले म्हणून काही नागरिक सुविधा-सुधारणांसंबंधी त्या नगरसेवकाकडे येतात. नागरिकांनी वॉर्डातील अडचणी, अस्वच्छता यांचा पाढा वाचताच उन्मत्त नगरसेवक शिवी हासडतो आणि 'तुमची मते पैशाने विकत घेतली' असे बजावतो. 'आम्ही काय नाल्या काढायला आणि रस्ते झाडायला पुढारी झालो का?' असा उद्दाम सवाल करतो. राजकारण्याच्या उन्मादामागे खोट्या प्रतिष्ठेची मिजास कशी असते याचेच हे अर्कचित्र.

कवी विश्वास वसेकर यांच्या राजकीय कविता केवळ व्यंगशोध घेत नाहीत, तर सहजपणे त्यांच्या सामाजिक प्रभावाचाही मागोवा घेतात. अशा प्रभावाची कविता विशेषतः अलीकडे गांभीर्याने पण प्रभावीपणे कवी फ. मुं. शिंदे यांनी लिहिली आहे. राजकीय वास्तवाचा सामाजिक आणि सांस्कृतिक आशय प्रगट करणारी कविता फ. मुं. शिंदे यांच्यानंतर वसेकरांनी लिहिली आहे यात शंका नाही. त्यांची 'प्रश्नोत्तरे' ही कविता लक्षवेधी आहे. राजकीय आणि अन्य क्षेत्रांतील थोर व्यक्तींनी केलेल्या निष्कलंक त्यागाच्या, अचल निष्ठांच्या पार्श्वभूमीवर या देशातील कःपदार्थ व्यक्तींच्या जगण्याच्या निर्वतनाच्या तऱ्हा म्हणजे क्षुद्र मनोवृत्तींचा विलासच! मानवी बधिरतेचा हा कळसच म्हणावा! लो. टिळकांनी तुरुंगवास का भोगला, तर भारतीय माणसांचे स्विस बँकेत खाते काढता यावे म्हणून. म. गांधींनी लाठ्या का खाल्ल्या, तर टेन पर्सेन्टमध्ये फ्लॅट मिळावा म्हणून. भगतसिंग फासावर का गेला, तर नगरपरिषदा आणि विधान भवनावर भगवा फडकावा म्हणून. सावरकरांनी जन्मठेप का भोगली, तर तुम्ही बाबरी मशीद पाडावी म्हणून. नेताजी सुभाषचंद्रांनी आझाद हिंद सेना का काढली, तर बोफोर्समध्ये दलाली मिळावी म्हणून. एवढंच नाही, तर

*साने गुरुजींनी प्राणत्याग का केला?*
*नामांतरविरोधासाठी झोपड्या जाळाव्यात म्हणून.*
*म्हा भीमानं घटना का लिवली?*
*तुम्ही शंभर रुपयाला मत विकावं म्हणून.* (पृ. ७७)

भारतीय मानसिकतेचं केवढे विदारक चित्र हे! थोरांचे विस्मरण ही राष्ट्रीय अधोगती आणि हानी आहे, हे शपथेवर सांगण्याची गरज नाही.

दक्षिण आफ्रिकेतील ख्यातनाम कवी डेनिस ब्रूट्स याने राजकीय कवितांच्या संदर्भात म्हटले आहे, की समाजाला प्रभावित करण्याची, विचारप्रवृत्त करण्याची आणि समाजमन बदलण्याची शक्ती राजकीय कवितांमध्ये असते. ब्रूट्स तर पुढे म्हणतो, की मी जर दक्षिण आफ्रिकेच्या निसर्गसौंदर्याचेच चित्रण करीत राहिलो आणि तिथल्या राजकारणापासून कविता अलिप्त ठेवू लागलो तर ती आत्मवंचना ठरेल आणि अप्रामाणिकपणाही. याचा अर्थ इतकाच, की कोणत्याही देशातील राजकीय कविता त्या त्या देशातील समाज आणि राजकीय वास्तव दुर्लक्षून लिहिता येणार नाही. कवी वसेकर यांची कविता समकालीन स्थितिगतीचा कठोर परामर्श घेते. समकालीन सामाजिक व राजकीय अराजकाला लक्ष्य करते. राष्ट्राच्या उत्थानाला सुरुंग लावू पाहणाऱ्या राजकारण्यांविषयी चीड व्यक्त करते. हा संताप निरोगी आहे.

*खुर्च्या सांभाळू पाहणाऱ्यांनो*
*आणि गुडघ्याला बशिंग बांधणाऱ्यांनो,*
*बस्स, बस करा हा तमाशा*
*जनता कधीच शहाणी होणार नाही*
*हे गृहीत नका धरू-*
*अंतिम न्यायालय जनता आहे हे खरेच आहे.* (पृ. ६५)

आजची बरीचशी मराठी कविता साचेबद्धतेत, मध्यमवर्गीय संवेदनशीलतेत अडकून पडलेली आहे. कवी विश्वास वसेकर मात्र परिघाच्या बाहेर येऊन समाज, संस्कृती आणि राजकीय वास्तव यांचे भान आपल्या कवितेतून व्यक्त करतात. या वास्तवाचा ते नकारात्मक विचार करीत नाहीत, मानवी दृष्टिकोनातूनच ते विचार करतात. त्यामुळे वसेकरांची सामाजिक व राजकीय आशयाची कविता व्यंगदर्शनाबरोबरच अंतर्मुख करीत चिंतनशीलता धारण करते हे निर्विवाद.

◆

डॉ. गंगाधर पानतावणे
दूरध्वनी : ०२४०-२३७०६६६



अनुक्रमणिका



विशेष लेख

भूषण राक्षे




# जोहार
## अस्सल देशी भान व्यक्त करणारी मौलिक कादंबरी

सुशील धसकटे या तरुण लेखकाची 'जोहार' ही कादंबरी अक्षरवाङ्मय प्रकाशनाच्या वतीने अलीकडेच प्रकाशित झाली आहे. नव्वदोत्तर कालखंडातील खासगीकरण-उदारीकरण-जागतिकीकरण या पर्वाचे सडेतोड विश्लेषण या कादंबरीतून आले आहे. या कादंबरीचा व्यापक पट उलगडणारा नव्या दमाचे अभ्यासक भूषण राक्षे यांचा हा लेख.

■

'मी टेकडीवर जाऊन बसलो. ढग पाहून मला वाटलं, आता गावाकडे सगळेजण बी-वियाणं तयार करत असतील. आपण बऱ्याच वर्षांत पेरणी पाह्यली नाही. पेरणीत सगळंच सुंदर असतं. नाही तर इथे पहा...

शहरातला मनुष्य आपण काय खातो हेसुद्धा किड्यांसारखंच पाहून जगतो. सगळं पैशाच्या हिशोबातूनच. म्हणजे आपण रोज भातपोळी खातो, तर ती कुठून येते...

...तर किराणा दुकानातून गहू-तांदूळ आणून मोकळे. आता जमिनीतून गहू येणं आणि किराणा दुकानातून येणं ह्यात केवढा फरक! ह्यांना जमीन काय ते माहीतच नाही. जमिनीचा आणि यांचा संबंधच नाही. हे डांबरी रस्ते करून जमीन बुजवून शिवाय वरून बूट घालून चालतात आणि सिमेंटमध्ये राहतात.' (भालचंद्र नेमाडे यांच्या 'कोसला'तून)

---------

'कांतारामजी,

सगळ्यात वाईट तुम्ही जागतिकीकरणाचे समर्थन करताय. जागतिकीकरणाला थोपवता येत नाही. एकदम मान्य. पण त्याला पेलण्यासाठी, मुकाबला करण्यासाठी आपल्याकडे तयारी काय? काहीच नाही. पिकात वळू घुसला की तो पिकाचे नुकसानच करणार. त्याच्या शेणाचे खत झाले की पीक पुन्हा तरारणार, ही एकदम भंपक गोष्ट. वळू एकाच्या शेतात पीक खाणार आणि दुसऱ्याच्या शेतात खत. लाभ दुसऱ्यालाच. हे तुम्ही समजून घेत नाही. तुमचे म्हणणे, बाजारपेठ खुली झाली की शेतकऱ्याच्या मालाला किंमत येणार. पण त्याचा माल पिकवायला पोषक वातावरण तर पाहिजे? पाणी-वीज नाही. ऊस पिकवा. कांदा पिकवा. विका. पाऊसच नाही. ज्वारी पिकवा. तुमच्या भाकरीला शंभर रुपये दर मिळणार. पण ज्वारी पोटापुरती पिकवण्यासारखे वातावरण नाही तिथे भाकरी विकणार कसली? इथल्या मूलभूत सुविधांचे तुम्ही बोलत नाही. तुमची चळवळ बोलत नाही. का?' (राजन गवस यांच्या 'ब- बळीचा'मधून)

वर उद्धृत केलेल्या मराठी साहित्यातील दोन महत्त्वपूर्ण कादंबऱ्यांतील उताऱ्यांचा व या दोन्ही कादंबरी लेखकांच्या विचारभूमिकेचा अनुबंध मला सुशील धसकटे या तरुण लेखकाच्या 'जोहार' या अक्षरवाङ्मय प्रकाशनाने प्रसिद्ध केलेल्या कादंबरीशी अत्यंत विचारपूर्वक जोडावासा वाटतो. नेमाडे यांच्या 'कोसला'तील पांडुरंग सांगवीकरच्या सारखीच कृषिसंस्कृतीची पार्श्वभूमी लाभलेला 'जोहार'चा नायक मल्हार हा आजच्या पिढीतील शिक्षणासाठी शहरात आलेला, परंतु आपल्या घट्ट देशी जाणिवा सतत सोबत





अनुक्रमणिका

बाळगणारा कारा तरुण आहे. 'कोसला'तील पांडुरंगसारखे मल्हारचेही आजच्या काळातील गाव आणि शहरात मिसफिट होणे जोहारमध्ये आले असले, तरी या मिसफिट होण्यातून सुटका करण्यासाठी त्याने शोधलेला देशी कृषिजन संस्कृतीचा मार्ग अधिक महत्वाचा आणि व्यापक असल्याने ही कादंबरी आताच्या कालखंडातल्या खासगीकरण-उदारीकरण-जागतिकीकरण पर्वाचे सडेतोड विश्लेषण करते आणि या खाउजा धोरणाचे आजवरच्या मराठी साहित्यात जे तुरळक प्रतिबिंब उमटले होते त्या उणिवेची कसर भरून काढते, असे म्हणता येते. 'ब-बळीचा' या कादंबरीने खऱ्या अर्थाने मराठी कादंबरीत खाउजा धोरणावर योग्य ते भाष्य करून या धोरणाचे परखड मूल्यमापन केले. या कादंबरीने वाचकांसमोर उपस्थित केलेल्या प्रश्नांची आणि 'जोहार'मधून मल्हार या काऱ्या तरुणाने उपस्थित केलेल्या प्रश्नांच्या वेदनेची जातकुळी ही एकच आहे.

नव्वदीनंतरच्या कालखंडापासून भारतात जागतिकीकरण पर्व सुरू झाले. हळूहळू या धोरणाने भारतीय अर्थव्यवस्थेचा ताबा घेतला नि नवसाम्राज्यवादी व्यवस्थेने भारतीय शेतीव्यवसायाचे लचके वेगाने तोडायला सुरुवात केली. याचा पहिला बळी दुर्दैवाने बळीराजाच होता. नागरीकरणाच्या चकाकत्या भांडवली भानगडींनी खेडीपाडी उद्ध्वस्त व विनचेहऱ्याची करून टाकली. सद्य:स्थितीला भारतातील खेड्यांत जमिनींचे असमान विभाजन आहे. खाउजा धोरणानंतर उच्चभ्रू भांडवलदारी शेतकरी, राजकारणी, बिल्डर्स व जमीन एजंट्स यांनी बहुसंख्य दुर्बल शेतकऱ्यांच्या जमिनी बळजबरीने हिसकावून स्वत:च्या ताब्यात ठेवलेल्या आहेत. अल्पभूधारक शेतकऱ्याच्या वाट्याला अस्मानी आणि लोकशाहीच्या नावाखाली सुलतानी छळवाद मोठ्या प्रमाणावर आलेला आहे. शेतजमिनी विकण्यासाठी त्यांच्यावर अत्याचार करण्यात येत असल्याने जीव वाचवण्यासाठी कवडीमोल भावाने जमिनी विकून हे अल्पभूधारक शहराकडे वळत आहेत. अल्पभूधारकांच्या तुलनेत थोडी अधिक जमीन असलेल्या शेतकरी जातसमूहांच्या शेती उत्पन्नांना भाव न मिळणे, वीजपाण्याचा प्रश्न निर्माण होणे, नुकसानभरपाईची अपुरी पॅकेजेस सरकारकडून जाहीर होणे, त्यातही भ्रष्टाचार होऊन हाती काही न येणे, अशा विविध समस्यांत सर्वहारांना गुंतवून ठेवले जात आहे, ज्या द्वारे शेतकऱ्यांचे त्यांच्याच उपजाऊ शेतजमिनीतून सक्तीचे व अनैच्छिक विस्थापन करणे चालू आहे. दुसऱ्या बाजूला, जंगलजमिनी ह्या खाणउद्योग, धरणे व सेझच्या नावाखाली बळकावल्या जात असून आदिवासींना त्यांच्याच मुळांपासून तोडले जात आहे. त्यामुळे रोजगार नाही आणि रोजगाराचे साधनही नाही. म्हणून विस्थापित झालेला हा समग्र समूह झुंडीने शहराच्या दिशेने पोटापाण्यासाठी स्थलांतर करतो आहे. झोपडपट्टीशिवाय या झुंडींना शहरात आश्रय नाही. शहरातही रोजगाराची पूर्ण शाश्वती नाही. त्यामुळे शहरी भांडवली व्यवस्थेकडून या भूमिहीनांचे अपरिमित शोषण होत आहे. झोपडपट्ट्यांवर राजकारणी, बिल्डर्स लॉबीचा ताबा असल्याने मतपेटीचे राजकारण आणि झोपडपट्टी पुनर्वसन यात आयताच सापडलेला हा भूमिहीन देशोधडीला लावला जात आहे. त्यामुळे स्वत:च्याच मुलुखात परागंदा, उपरा असल्याची त्याची भावना बळावते आहे. त्यातच जातीपातीचे, धर्मांचे राजकारण, प्रादेशिक अस्मितांचे समर्थन यांचा वापर सर्वसामान्यांना गुंगीत ठेवण्यासाठी मोठ्या प्रमाणावर होत असून त्यामुळे शहर आणि गावपातळीवर समांतरपणे बेकारी-दारिद्र्य-गुन्हेगारी या समस्या निर्माण होत असल्याचे सद्य:स्थितीचे भयानक वास्तव आहे.

आता एवढे सारे भयंकर रामायण घडत असूनही मराठी साहित्य त्याच्या मध्यमवर्गीय वृत्तीतच मश्गुल आहे, असे म्हणावे लागते. कारण राजन गवस यांची 'ब-बळीचा' ही कादंबरी, जयंत पवार यांचा 'फिनिक्सच्या राखेतून उठला मोर' हा कथासंग्रह, अरुण काळे आणि भुजंग मेश्राम यांच्या कविता असे काही अपवाद सोडले तर इतरांकडून जागतिकीकरणावर बारीक बारीक-तोकडे तोकडे असे भरपूर लिहून झाले आहे, होत आहे. पण ज्या समग्रपणे गवस, पवार, काळे व मेश्राम हे बदलत्या परिस्थितीबाबत व्यक्त झाले आहेत त्याच्या आसपासही इतरांचे लेखन पोहोचू शकलेले नाही.

या पार्श्वभूमीवर सुशील धसकटे या तरुण लेखकाच्या 'जोहार' या कादंबरीने मात्र अत्यंत सखोलपणे खाउजा धोरण, त्यामुळे बदलत जाणारे नागरी व ग्रामीण जीवन, भांडवलशाही आणि तिच्या बाजारू धोरणांचे सामान्य माणसावर होणारे विघातक परिणाम दर्शवत त्याचे 'नो व्हेअर' होत 'कुत्ते की मौत' मरणे टिपले असल्याने ही कादंबरी नव्वदीनंतरच्या कालखंडावर ठसठशीतपणे अभ्यासपूर्ण भाष्य करणारी महत्त्वाची कलाकृती ठरते.

घरात उशिरा शिक्षण आलेल्या सामान्य शेतकरी कुटुंबातील दुसऱ्या जबाबदार पिढीतील मल्हार या मराठवाड्याच्या खेड्यातील तरुणाचा एमएच्या शिक्षणासाठी पुणे शहरात आल्यापासूनचा ते त्याचे एमफिल पूर्ण होईपर्यंतचा पट सुशीलने 'जोहार' या कादंबरीत समग्रपणे व साकल्याने मांडलेला आहे. मल्हारच्या या प्रवासाचा कृषिजन संस्कृती हा देशीवादी केंद्रबिंदू असून खाउजा धोरणाने बदलत जाणारे समाजकारण व त्याची पोलिटिकल इकॉनॉमी हा परीघ आहे. जातिधर्माच्या अस्मिता संकुचित व टोकदार झालेल्या या काळातील चिंचोळ्या अवकाशात जगण्याचे समृद्ध भान स्वत:च्या परंपरांमधून शोधत त्याचा स्वत:सह इतरांना प्रगल्भ करत जाणारा हा प्रवास साचलेली कोंडी फोडण्याच्या दिशेने आत्मविश्वासपूर्वक होत आहे. अब्राह्मणी परंपरेच्या मूलभूत विचारतत्त्वांच्या भरभक्कम वारशाच्या आधाराने मल्हारने समकालीन समाजसंस्कृतीचे धाडसी पोस्टमॉर्टेम केलेले आहे. मल्हारच्या या पोस्टमॉर्टेमचे रिपोर्ट अनेकांना स्वत:चे सिद्धान्त आणि भूमिका तपासायला पुन्हा पुन्हा भाग पाडणारे आहेत नि माणुसकीच्या व्यापक पर्यायाकडे घेऊन जाणारे आहेत. एक लेखक म्हणून सुशीलच्या यशाच्या मूल्यमापनात ही बाब मला महत्त्वाची वाटते.

महात्मा जोतीराव फुले-महर्षी विठ्ठल रामजी शिंदे-महात्मा गांधी-प्राच्यविद्यापंडित शरद पाटील ते ज्ञानपीठकार भालचंद्र नेमाडे या विचारवंतांची सम्यक् दृष्टी घेत 'जोहार'च्या नायकाने केलेली वाटचाल ही 'बुडती हे जन न देखवे डोळा' या संत तुकाराम यांच्या निर्मळ व पारदर्शी कळवळ्याशी नाते घट्ट करणारी आहे. 'जोहार' ही कादंबरी एका अर्थाने 'शेतकऱ्याचा असूड'च आहे असे मला वाटते. या असुडामागे 'भले तरी देऊ गांडीची लंगोटी' हा भरभक्कम मजबूत असा देशी हात आहे. जोहारची कहाणी ही फक्त महाराष्ट्रातल्या शेतकऱ्यांची, सामान्यजनांची म्हणून मर्यादित करता येत नाही. खाउजा धोरणाने नागवल्या गेलेल्या प्रत्येकाचेच ते प्रातिनिधिक रूप आहे. त्या प्रत्येकाचीच ती कहाणी आहे. मूठभर शोषकांच्या प्राचीन वाटचालींपासून ते सद्य:स्थितीपर्यंतचे अप्रिय पण महत्त्वाचे दाखले देत लेखकाने वाजारू, मतलबी विचारसरणीच्या मर्यादा 'जोहार'मधून उघड्या पाडल्या आहेत. कशाचीही शाश्वती नसलेल्या जागतिकीकरणाच्या रेट्यात दडपल्या व दळल्या गेलेल्या सकल स्त्री-पुरुषांच्या सहवेदनेचा स्वर जोहारमधून ठळकपणे ऐकायला येतो. तो आपणाला दुर्लक्षित करता येत नाही. उघड्या कानांनी त्याची दखल घ्यावीच लागते.

शहरी-ग्रामीण-प्रादेशिक-दलित-आदिवासी असे झापडबाज कप्पेबंद सुरक्षित व सोपे वर्गीकरण लेखकाने नाकारल्याने ही कादंबरी एकंदर मानवी समूहाची म्हणून आपल्या पुढे येते. जल-जंगल-जमिनीला पारख्या होणाऱ्या व शासन आणि साम्राज्यवाद यांच्या चिमटीत पकडल्या गेलेल्या सामान्य माणसांच्या मनोगताला लेखकाने मल्हार या 'जोहार'च्या नायकाच्या माध्यमातून वाचा फोडलेली आहे. हा नायक पुणे-मुंबई म्हणजेच महाराष्ट्र या चेहऱ्याला सणसणीत चपराक लगावतो आणि मतलबी भांडवलशाहीवादी व्यवस्थेसमोर अत्यंत मूलभूत प्रश्न उभे करतो, ज्यांची उत्तरे देण्याची ही व्यवस्था सातत्याने टाळत आलेली आहे. म्हणूनच ही कादंबरी ४२-४५ डिग्रीच्या रणरणत्या उन्हात अनवाणी पायाने शेतात कुळव घालणाऱ्या जानूतात्याची, मुंबईच्या डंपिंग ग्राऊंडवर स्वत:च्या जिवाशी खेळत मुंबईकरांनी केलेल्या घाण-कचऱ्याची विल्हेवाट लावणाऱ्या सखा कांबळेची, पुण्याच्या ड्रेनेज लाइन साफ करणाऱ्या सटवाचीदेखील आहे. त्यांचे प्रश्न, त्यांचे हतबल आवाज 'जोहार'मधून ऐकू येतात व वाचणाऱ्या प्रत्येकालाच ते अस्वस्थ करून सोडतात, मुळापासून हादरवतात, डुलक्या घेणाऱ्यांना जागे करतात. पण यातूनही मग मल्हारसमोर प्रश्न उभा राहतो. की उदारीकरण पर्व, विकास पर्व या नावाने झोपेचे सोंग घेतलेल्यांचे काय?



या वाजारू व्यवस्थेत मल्हारच्या अनुभवसिद्ध शहाणपणासोबत त्याला आधार लागतो तो महानुभाव व संतपरंपरेचा, फुले-शिंदे-गांधी यांच्या समग्र देशी वाङ्मयाचा नि प्राच्यविद्यापंडित शरद पाटील यांच्या मूलभूत संशोधकी लिखाणाचा. विद्यापीठाच्या भंपक, संधिसाधू व भ्रष्ट वातावरणातही तो स्वत:चा तोल याच संचितातून सावरतो व सभोवतालच्या फसव्या, दुतोंडी सामाजिक पर्यावरणाच्या विकास नामक जाहिरातबाज अंतरंगाची तितक्याच कठोरपणे व तटस्थपणे छाननी करतो. अहिंसक लोकशाहीवादी पर्यायांमध्ये झोकून देत सातत्याने स्वत:ला क्षणाक्षणाला चाचपडत राहतो, तपासत राहतो. त्याच्या प्रत्येक कृतीमागे सुस्पष्ट असा ठाम विचार आणि प्रचंड नैतिकता आहे, जी देशी संस्कारातूनच आलेली आहे. ही नैतिकता त्याला आजच्या रोगट वातावरणात तगवून ठेवते, उभे राहण्याचे बळ देते. मूलभूत जगणेच महाग झालेल्या भ्रष्ट वातावरणात विभागला गेलेला भारत देश त्याला दोन रूपांत दिसतो. एक भारत देश, जो श्रीमंतांचा, उच्चभ्रू-भांडवलदारांचा आहे; तर दुसरा भारत देश हा कॉमन मॅनचा आहे. या द्वंद्वात मल्हारची होणारी मानसिक घालमेल जोहार कादंबरीच्या केंद्रस्थानी आहे. 'सारेच संपले आहे, पेक्षा हरून चालणार नाही' हा विचार बदलत्या काळात स्वत: सतत मुरवण्याचा प्रयत्न करणारा संवेदनशील मल्हार हा 'जोहार' या कादंबरीचा नायक म्हणूनच मला महत्त्वाचा वाटतो.

भारतीय ग्राम समाजाला मोडून काढण्याची इतिहासदत्त कामगिरी सर्वप्रथम साम्राज्यवादी ब्रिटिश भांडवलदारांकडून पार पडली, हे शरद पाटील यांचे संशोधन महत्त्वपूर्ण आहे. यापुढील टप्प्यात येथील प्रस्थापित भांडवली व्यवस्थेने हाच कित्ता गिरवत

खाउजा धोरणापर्यंत देशाला आणून सोडले व पुढे या धोरणाने येथील ग्रामव्यवस्था नेस्तनाबूत करून टाकत आणल्याचे आपण पाहतो. खाउजानंतच्या या टप्प्याचे विश्लेषण जोहार या कादंबरीत सुशीलने अत्यंत बारकाव्यांसह मांडलेले दिसते. यासाठी त्याने एकाच कालखंडात शहरी व ग्रामीण भागात होणारे बदल विविध उदाहरणांच्या व प्रसंगांच्या स्वरूपात दिलेले आहेत. ते वास्तव वाटावेत इतके स्पष्ट व ढळढळीत आहेत. मल्हारच्या शिवाजी या औरंगाबादस्थित मित्राच्या व त्याच्या बायकोमध्ये निर्माण झालेले तणाव व गावाकडच्या परशा सोळंकेचा संशयास्पद मृत्यू ही या बदलाची अत्यंत गंभीर अशी उदाहरणे आहेत. या उदाहरणांमागचे, प्रसंगांमागचे लेखकाचे निरीक्षण, सूक्ष्म चिंतन हे त्या घटनांचे विविध कंगोरे वाचून जाणवते. जणू आपल्या आसपासचे हे उदाहरण, ही घटना आहे इतके ते हुवेहूब जिवंत वाटते. वास्तव हे एकपदरी नसते, त्याला अनेक स्तर असतात व ते गुंतागुंतीचे असतात, हे या कादंबरीच्या वाचनातून अधिक सुस्पष्टपणे पुढे येते.

विद्यापीठ, तिथली शिक्षणव्यवस्था, प्राध्यापक मंडळी, मित्र, विविध जातीय अलायन्स या सर्वांच्या पार्श्वभूमीवरील ही कादंबरी फक्त विद्यापीठीय राजकारणापुरती किंवा शिक्षण क्षेत्रापुरती सीमित राहत नाही. जागतिकीकरणासारख्या महत्त्वाच्या विषयाचा आशय कादंबरीतून अधिक प्रभावीपणे पोहोचत असल्याने आणि बदलता गावगाडा व नागर समाज हादेखील या कादंबरीतून थेटपणे स्पष्ट होत असल्याने ही कादंबरी अधिक व्यापक होते. या कादंबरीतील घटना-प्रसंग हे सद्य:कालीन गुंतागुंतीचे वास्तव मांडू पाहत असल्याने ती तद्दन फिल्मी किंवा नॉस्टेल्जिक नाही.

विद्यापीठातील केशा, मंग्या, नाम्या, पक्या, सुऱ्या, गोरख, राजा, संज्या, चव्हाण, रूप्या या मित्रांशी मल्हारची भाषिक राजकारण, भांडवलशाही व्यवस्था, जागतिकीकरण, बदलते राजकारण व बदलता गावगाडा, भंकस शिक्षणव्यवस्था, भांडारकर प्रकरण, बहुजन न्यूनगंड, राष्ट्रीय एकात्मता व धार्मिक जातीय दंगे या मुद्द्यांवर होणारी चर्चा कादंबरीला विस्तृत आयाम देणारी, प्रभावी व प्रवाही ठेवणारी आहे. समकालीन स्थानिक-राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय घटनांचे कंगोरे व काऱ्या तरुणांचे भावविश्व सुशीलने अतिशय बारकाईने टिपल्याचे यातून दिसून येते. तरुण वयातील नैसर्गिक लैंगिकता; तरुणांच्या स्वभावांचे, बोलीभाषांचे विविध नमुने, खेड्यातून शहरात आलेल्या सामान्य मुलांचे प्रश्न, शहरी मुलांचे वेगळे जाणवणारे व जाणवून दिले जाणारे अस्तित्व, मुलांची स्लँग बोली, वर्ग व जातजाणिवा अशा व्यापक पटाचे यातून दर्शन होते.

तंबाखूला हे सर्वजण 'रसिकरंजनगुटिका' म्हणतात. सत्यशोधक चळवळीचा अभ्यास करणाऱ्या सुऱ्याभौने हा शब्द शोधलेला आहे. अनैतिक वागणाऱ्या सुमार प्राध्यापकांसमोर त्यांना रसिकरंजनगुटिका खाण्यात वाईट वाटत नाही. किंबहुना ते अधिक त्वेषाने हे कृत्य करतात. पण हेच विद्यार्थी अभ्यासू व स्वच्छ चारित्र्याचे प्राध्यापक भोसल्यांचा खूप मान ठेवतात. त्यांच्या समोर भरपूर वाचन, अभ्यास व पूर्ण तयारी केल्याशिवाय उभे राहणे त्यांना चुकीचे व भोसले सरांचा अपमान करणारे वाटते. म्हणूनच हे विद्यार्थी चुकलेले, बहकलेले किंवा बेशिस्त वाटत नाहीत. मल्हारच्या व त्याच्या या मित्रांच्या गप्पांतून, चर्चेतून त्यांचे वाचन, सुस्पष्ट मते कळतात. ग्रामीण भागातून आल्याने एक उपजत व्यावहारिक शहाणपण त्यांच्यात आहे. याउलट, विद्यापीठीय शिक्षणव्यवस्था अधिक किडलेली, भ्रष्ट अशी आहे. एका बाजूला येथे बी० व्ही० भोसले सरांसारखे अत्यंत नैतिकतेने वागणारे, विद्यार्थ्यांना दिशा देणारे प्राध्यापक आहेत; तर दुसऱ्या बाजूला याच मराठी विभागात सौंदर्यप्रसाधने बनवणाऱ्या परदेशी कंपनीचे प्रॉडक्ट आपल्या गोरगरीब विद्यार्थ्यांना विकत घ्यायला भाग पाडणाऱ्या प्राध्यापिका दाते मॅडम आहेत. त्यामुळे मल्हार आणि त्याच्या मित्रांना त्या गुरू न वाटता सेल्स एक्झिक्युटिव्ह वाटतात. वर्गातील तासांऐवजी व्याख्याने, चर्चासत्रे करणारे; पीएचडीच्या विद्यार्थिनीसोबत केरळला सुट्टी घालवणारे, पीएचडीच्या विद्यार्थ्यांकडून पैसे लाटणारे प्राध्यापक पळसकर व विद्यार्थ्यांसोबत त्यांच्याच पैशाने दारू पिणारे डॉ. कांवळे यांच्यासारख्या प्राध्यापकांचे चित्रण करून शिक्षणव्यवस्थेतील व्यत्यास अतिशय जळजळीतपणे 'जोहार'मध्ये मांडून लेखकाने सद्य:कालीन शिक्षणव्यवस्थेचे वाभाडे काढले आहेत. थोड्याफार फरकाने शिक्षणक्षेत्रातील ही स्थिती आजमितीला आपल्या देशात सर्वत्रच दिसून येते. म्हणूनच 'ही शिक्षणव्यवस्था म्हणजे नुस्ते पढीक मुस्टंडे पैदा करणारी व्यवस्था उरलीय, खेड्यांची भकास शहरं करणारी' हे मल्हारचे अगतिक उद्गार बदलत्या बाजारू मूल्यांच्या वरचढीमुळे होणाऱ्या सामाजिक पर्यावरणाच्या ऱ्हासाचे निर्देशन करते. हा बदल केवळ शहरी भागातच होतोय असे नाही, हे लेखकाने मल्हारच्या गावाकडील प्रा० जोशींच्या उदाहरणातून स्पष्ट केले आहे. प्रमोशनसाठी, क्रेडिट पॉइंट मिळवण्यासाठी प्रा० जोशी स्वत:चा भंकस कवितांचा संग्रह स्वत:च्याच पैशाने छापून तो अभ्यासक्रमात लागावा म्हणून साहित्यिक दलालांना दारू पाजतात. साम-दाम-दंड मार्गाचा वापर करून स्वत:च्या फायद्यासाठी कनिष्ठ पातळी गाठतात. हे सारेच भ्रष्ट प्राध्यापक आजच्या चंगळवादी संस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून कादंबरीतून समोर येतात.

शिक्षणाची भली थोरली परंपरा नसलेल्या ग्रामीण खेड्यापाड्यांतील तरुण-तरुणी शहरांतील संस्थांत शिक्षण घेऊन नोकरी, रोजगार मिळेल या अपेक्षेने स्थलांतर करतात. अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत जगतात. पण त्यांच्या मूलभूत गरजा भागवणारा रोजगारही त्यांना मिळू शकत नाही. शहर आणि गावाच्या पेचात अडकलेल्यांचे येथील व्यवस्था शोषण करत कसे चिपाड करून टाकते याचे अत्यंत दाहक वर्णन लेखकाने कादंबरीतून केले आहे. विद्यापीठात शिक्षण घेणारे विद्यार्थी एमए, नेट-सेट, एमफिल, पीएचडी करण्यात आणि नंतर

प्राध्यापकाची नोकरी शोधण्यात संपूर्ण तारुण्य वाया घालवताना दिसतात. ती त्यांची मजबूरी असते. कारण पैशांशिवाय संस्थाचालक नोकरी देत नाहीत. अपवादात्मक संस्था तर बोटांवरही मोजता येत नाहीत इतक्या असल्याने ते शिक्षण-बेकारी-दारिद्र्य या 'बर्म्युडा ट्रँगल'मध्ये अडकतात. गरीब विद्यार्थ्यांपुढे तर शिक्षण, अन्नपाणी, कपडेलत्ते, प्रवास हा मूलभूत खर्चाचा प्रश्न आ वासून उभा असतो. स्टायपेंडच्या पैशांवर प्राध्यापकांचा डोळा असल्याने ते ब्लॅकमेलिंगच्या उद्योगाखाली त्या पैशाने स्वत:च्या नशापाण्याची हौस भागवून घेतात. म्हणूनच मल्हारला व त्याच्या मित्रांना हे शिक्षण म्हणजे आई-बापाला फसवण्याचे धंदे वाटतात. तसेच खुरडत खुरडत उपाशीपोटी दात कोरून जगत राहणारे, आज ना उद्या आपल्याला नोकरी मिळेल या अपेक्षेने अभ्यास करणारे विद्यार्थी विद्यापीठ नावाच्या भ्रष्ट सिस्टीमचे बळी ठरतात. खोट्या व्यवसायाभिमुख शिक्षणाने बेकारांच्या संख्येत भर टाकण्यापलीकडे काहीच होत नाही, हेदेखील लेखक येथे मांडतो. वर्तमानपत्रे, प्रकाशनसंस्था या व्यवसायांमधील उच्च जातींचे प्रावल्य, संधीचा अभाव, चार ते पाच हजार इतका अल्प पगार, टोकाची जीवघेणी स्पर्धा, कुठल्याही क्षणी बेकार होण्याची स्थिती, अनैतिक व्यवहार, मेडिकल इन्शुरन्स, सुरक्षासुविधा नसणे यामुळे अशा व्यवसायाभिमुख शिक्षणाने प्रश्न सुटण्याऐवजी वाढत जातात. यातूनच मग फुकाचा भाषाभिमान बाळगण्यापेक्षा पोटाला देईल तीच भाषा आपली, हा विचार कादंबरीतील विद्यार्थ्यांच्या तोंडून नाइलाजाने बाहेर पडतो. तो समजून घेणे अत्यंत गरजेचे आहे. कारण शिक्षण घेऊन बेकार होणे आणि जागतिकीकरणात मरू घातलेल्या शेती व्यवसायातून हाती काही न येणे यात फरकच राहत नाही. 'इकडे आड तिकडे विहीर' अशी अवस्था झालेल्या सर्वसामान्य गरीब तरुणांसमोर आला दिवस ढकलत यंत्रवत जगणे, मरण कवटाळणे किंवा अनैतिक पद्धतींचे जीवन स्वीकारत भौतिक हव्यासात स्वत:ला बुडवून टाकणे खाउजामुळे वाढल्याचे लेखक स्पष्ट करतो. पण यावरून हा लेखक नकारात्मक विचारसरणी येथे निर्माण करत आहे, असा अर्धवट निष्कर्ष काढणे चुकीचे ठरेल. लेखक येथे कादंबरीच्या माध्यमातून सद्य:स्थितीचे वास्तव व दाहक दर्शन घडवतो आहे. त्याने निर्मिलेले 'जोहार'मधील मल्हार हे मुख्य पात्र सभोवतालची परिस्थिती समजून घेत झालेल्या सामाजिक रोगाचे निदान करत आहे. जागतिकीकरणाच्या आव्हानाला मल्हार देशी मूल्यव्यवस्था व कृषिजन संस्कृती यांच्या साहाय्याने सामोरा जाण्याचा आग्रह धरतो. आपल्या बहुजन परंपरेच्या संचिताचा भरभक्कम पर्याय वापरणे त्याला महत्त्वाचे वाटते. इथल्या मातीतील महानुभाव-वारकरी, संतसाहित्य, फुले-गांधी-शिंदे-आंबेडकर-शरद पाटील-भालचंद्र नेमाडे अशी विस्तृत विचारधारा त्याच्यातील सत्त्व कायम ठेवते. तो संपूर्णपणे निराशेच्या, आत्मवंचनेच्या, स्क्रिझोफ्रेनिक अवस्थेत जात नाही, हे या कादंबरीतून स्पष्ट होत असल्याने कादंबरी नकारात्मकतेच्या किंवा अगम्य दुर्बोधतेच्या आहारी जात नाही, तर सकलांच्या छोट्याशा का होईना, प्रबोधनाकडे नवी पायवाट करण्यासाठी सकारात्मकतेने वळते, हे येथे नोंदवावेसे वाटते.

'जोहार' कादंबरीचा नायक मल्हार हा तरुण प्रगल्भ वाचन करणारा आहे. महानुभाव वाङ्मय ते सद्य:कालीन महत्त्वपूर्ण पुस्तकांचे त्याचे दांडगे वाचन आहे. तसेच भोसले सरांसारख्या अत्यंत अभ्यासू शिक्षकाकडे तो एमफिलचे मार्गदर्शन घेत असल्याने परंपरा व नवतेकडे पाहण्याची त्याची दृष्टी अतिशय मर्मवेधी व तयारीची झाल्याने स्वत:ची वैचारिक भूमिका व तिचे भान त्याला आलेले आहे. म्हणूनच आपली स्वत:ची कष्टकरी परंपरा समजून घेत, ती तपासत, स्वत:ला तिच्याशी जोडत तो स्वत:ला पडलेल्या प्रश्नांचा वेध घ्यायला लागतो व गुंतागुंतीच्या, गोंधळाच्या स्थितीचा योग्य लेखाजोखा मांडू पाहतो. यातूनच त्याला भरभक्कम आत्मविश्वास मिळतो. त्या आधारेच तो भंपक गोष्टींची फोलपटे सोलून काढत गाभ्याच्या मुद्द्यालाच हात घालतो. 'आपुलाचि वाद आपुणासी' ह्या तुकोबांच्या विचाराला समांतर जाणारा व कादंबरीत एक चांगला फॉर्म म्हणून आलेल्या स्वगतपर निवेदनात एके ठिकाणी मल्हार स्वत:लाच समजून सांगताना म्हणतो, 'ज्ञानेश्वर-नामदेव-कबीर-मलिक अंबर-तुकाराम-शिवाजी-गालिब-मल्हारराव होळकर-जोतीराव-शिंदे-गांधी-आंबेडकर या समृद्ध परंपरेच्या व्यापक वारशाच्या साहाय्याने आपल्यालाही आता ह्या भयंकर उत्खननाला सिद्ध व्हावंच लागणार. दुसरी शिक्षित पिढी असली म्हणून काय झालं, शक्य तितकं खाली खाली झिरपल्याशिवाय एकंदर परंपरा-इतिहास-भूगोल आणि विज्ञानासकट त्यातील चिरंतनत्व कसं कळणार? आपल्याला नुसता इतिहासच नाही तर भूगोलही आहे, हे लक्षात घे मल्हार! एकेक करत अशा भूगर्भातील अनेक प्रस्तरांखालच्या गाभ्यातील समृद्ध चिरंतनत्व शोधलं पाहिजे, आपण जाम वेडं होऊन नि मन लावून. यास्तव ही खटपट करावीच लागंन. जे दिसलं, सापडलं ते सत्य-असत्या मन ग्वाही ठेवून आणि आपली परंपरा कुणालाही दाबणारी नाही, तर अवघ्यांना कवेत घेणारी आहे, हे ध्यानी ठेवून दाखवलंच पाहिजे. डेमो दिल्याशिवाय काय होत नाही हल्ली.'

विकट परिस्थितीत पलायन किंवा तडजोड करण्यापेक्षा मल्हारला स्वत:ची नैतिकता जपणे महत्त्वाचे वाटते. तो म्हणतो, 'या भयंकर भ्रष्टाचारी जगात आपण आपली नैतिकता जागी ठेवत स्वच्छ व प्रामाणिक आयुष्य जगणं महत्त्वाचं असून प्रत्येक टाका समजून-उमजून, मन लावून घातला पाह्यजे. ह्या एकेक टाक्यातूनच आपल्या आयुष्याची पुढची वीण समृद्ध, सुबक नि मजबूत होणार आहे. टाका असा घातला पाह्यजे की तो ऊनवाराथंडीपावसातही उसवला नाही पाह्यजे. तसा तो उसवला नाही म्हणजे आपण मिळवलं सगळं.' अशा प्रकारे कोण ऐको ना ऐको, आपण आपल्यापरीने सातत्याने प्रयत्न करत राहणे हाच एकमेव उपाय आता शिल्लक असल्याचे तो स्वत:ला बजावतो.



अनुक्रमणिका

स्वत:तील चांगुलपणा जपणारा मल्हार हा अत्यंत नैतिकतेने बाजारकेंद्री पर्यावरणाला सामोरा जाताना दिसून येतो. ही तीव्र नैतिकता त्याला त्याच्या कुटुंबाकडून, कृषिजन परंपरेतून आणि शहरात आल्यावर भोसले सरांच्या सान्निध्यातून व मार्गदर्शनातून मिळालेली आहे. हे संचित तो त्याच्या प्रवासात प्राणपणाने जपताना दिसतो. एमफिलच्या प्रबंधासाठी तो अत्यंत कष्टपूर्वक मेहनत करतो. इतरांसारखे उगाचच उरकायचे आहे म्हणून तो हे काम करत नाही. इतरांनी स्वीकारलेली भ्रष्ट माध्यमे, साधने तो कोणत्याही गोष्टीसाठी स्वीकारत नाही. त्याच्या या विचारामागे प्रखर नैतिक भूमिकाच आहे. म्हणूनच तो प्रा. जोशींबरोबर दारू पिण्यास नकार देत 'ज्या देशात आम जनतेला प्यायला पाणी नाही तेथे हे पाणी कोल्ड्रिंक्स कंपन्यांना पुरवले जाते, म्हणून मला कोल्ड्रिंक्सही नको', हे स्पष्टपणे ठणकावून सांगू शकतो. मल्हारच्या या गुणाचीच इतरांवर आदरयुक्त जरब आहे. त्यामुळे भ्रष्ट लोक त्याच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करताना दिसतात. प्रा. जोशी व त्यांचा कविमित्र खुलावळे यांच्यात साहित्यातील जातीय अलायन्सवर दारू पिऊन जोरजोरात चर्चा चालू असते. तेव्हा आपली स्पष्ट भूमिका मांडताना मल्हार त्यांना ऐकवतो, की '...असल्या फालतू गोष्टीत मला मुळातच इंटरेस्ट नाहीय. आपला अभ्यास चांगला करावा. जे आहे तेच खरं वास्तव मांडावं. नवीन संशोधन करावं. कुणाला खूप करायचं म्हणून वा कुणाला खुन्नस द्यायची म्हणून जर आपण वाचू-लिहू लागलो तर मग हे सगळं बंद केलेलं वरं. याच्यात मात्र तिन्हीकडच्या तरुणांचा हकनाक बळी जातोय, हे कुणी लक्षात घ्यायला तयार नाही. फुले-शाहू-शिंदे-सयाजीराव यांनी ज्यांच्यासाठी आपली हयात घालवली त्यांच्या कष्टाचं जातिभिनिवेशाच्या आहारी जाऊन हे असलं फळ आपण त्यांना देणार असू तर नैतिक सभ्यतेचे सगळेच मार्ग बंद होतात. मात्र, आम्हाला हे मार्ग बंद करायचे नाहीत. कारण मुळात आमची परंपराच फार व्यापक आहे. ती अशी कुणामुळे संकुचित होता कामा नये.'

स्वत:मधील नैतिकतेचे सत्त्व सातत्याने जपणे मल्हारला महत्त्वाचे वाटते. कारण 'उदारीकरणाच्या रगाड्यात माणसाच्या भावभावना, स्वाभाविक जगणं, माणुसकी आदी सगळ्यांचा चुराडा होतोय हे खरं, पण सगळ्यात जास्त चुराडा झाला तो नैतिकतेचा,' हे त्याचे निरीक्षण अत्यंत मूलभूत आहे.

कादंबरीच्या मूल्यमापनात लेखकाने समकालीन घटनांचा लावलेला अन्वयार्थ, घटितामागे कारणांचा घेतलेला शोध व त्यावरील भाष्य अतिशय महत्त्वाचे आहे. 'जोहार'च्या माध्यमातून विविध समकालीन घटनांतील गुंतागुंतीचे स्तर सुशीलने अभ्यासपूर्वक दाखवून दिल्याने ही कादंबरी फक्त ललित फॉर्म म्हणूनच समोर येत नाही, तर ती एक वैचारिक कृती, एक हस्तक्षेप म्हणूनही वाचकांच्या मनावर ठसते. उदाहरणार्थ, भांडारकर प्रकरणावरील कादंबरीतील दीर्घ प्रसंग या दृष्टीने महत्त्वाचा आहे. मल्हार या नायकाच्या विद्यापीठ शिक्षणाच्या काळातच भांडारकर संस्थेवरील हल्ल्याचे प्रकरण घडते. या घटनेवर मल्हार व त्याच्या मित्रांमध्ये गंभीरपणे चर्चा होते. या चर्चेतून या घटनेमागील अनेक कारणांमागचे पापुद्रे उलगडत जातात. या प्रकरणाच्या निमित्ताने मित्रांचे जे विचारमंथन चालते त्यात मल्हार अत्यंत बॅलन्स व सम्यक् भूमिका घेताना दिसतो. ह्या प्रकरणावर चर्चा करणारी सर्व तरुण मंडळी ही चांगले वाचन, अभ्यास करणारी आहेत. त्यांच्या भूमिका स्पष्ट व रोखठोक आहेत. मल्हार त्याच्या मित्रांना या घटनेकडे विवेकवादी भूमिकेतून पाहण्याचे सूचित करतो. सर्वच ब्राह्मणांना जातीयवादी ठरवण्यापेक्षा ज्या ज्या लोकांची या प्रकरणात चूक आहे त्यांचा निषेध करणे गरजेचे असल्याचे मत तो मांडतो. स्त्री- मग ती कुठल्याही जातीची असो, विनाकारण तिची बदनामी करणे हा हलकटपणा आहे यावर मल्हारचे मित्र ठाम आहेत. उजव्या विचारसरणीच्या लोकांचे व राजकारण्यांचे अशा प्रकरणातून फावत असते यावर ते बोलतात. शहरी मध्यमवर्गीय कम्युनिस्ट व समाजवाद्यांच्या मर्यादादेखील ते स्पष्ट करतात. त्यांच्या या चर्चेत संपूर्ण समाजाच्या जातिवादी मानसिकतेवरही बराच खल होतो. मल्हार अत्यंत समंजसपणे जातीच्या पलीकडे जाऊन समाजाकडे पाहणे गरजेचे असून आपल्या खऱ्या इतिहासाकडे वळणे, त्याचे योग्य ते संशोधन करणे ही आपली व पुढील पिढ्यांची जबाबदारी असल्याचे स्पष्ट करतो. ग्रंथ, इतिहास यांची उपेक्षा न करता खऱ्या इतिहासाला पुढे आणणे, टीकेला-टिप्पणीला योग्य ते अभ्यासू उत्तर देणे व आपली कृती-उक्ती संकुचित न ठेवता व्यापक ठेवणे गरजेचे असल्याचे आपल्या मित्रांना योग्य पद्धतीने पटवून देतो. मल्हारच्या मित्रांच्या म्हणण्यात तथ्य नाही असे नाही, पण मल्हारच्या ठाम भूमिकेमुळे ही सर्व चर्चा कम्युनल होत नाही किंवा भरकटतही नाही हे येथे लक्षात घ्यायला हवे. या घटनेनंतर मल्हारचे गोरख या त्याच्या रूम पार्टनरसोबत जे विचारमंथन घडते त्यातूनही त्याच्या समतोलवृत्तीचा प्रत्यय येतो. जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर अशा प्रकरणांमुळे जातजाणिवा ह्या अस्मितेच्या, संकुचिततेच्या अंगाने विकसित होता कामा नयेत, हे त्याला गरजेचे वाटते. सर्व जातिधर्मांच्या लोकांनी योग्य तो कटाक्ष पाळला नाही तर हे सारे अराजकाकडे जाऊ शकते व याचा फायदा राजकारणी सत्ता आणि जागतिक व स्थानिक भांडवलदारी व्यवस्था घेऊ शकते, याकडे तो लक्ष वेधतो. देशी व्यवस्थेचा, गांधीप्रणीत ग्रामस्वराज्याचा ढाचा जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे मोडकळीस आल्याने तो पुन्हा सांधणे अत्यंत गरजेचे असल्याने लेखकाचे अभ्यासपूर्ण मत दुर्लक्षित करून चालणार नाही. भांडारकर प्रकरणानंतर कादंबरीत येणारे मल्हारचे प्रदीर्घ स्वगत बदलत्या काळाविषयी, मूल्यजाणिवांविषयी कळकळीने भाष्य करते. नो व्हेअर होऊ पाहणाऱ्या सकल मानव जातसमूहांचे अगतिक जगणेच लेखक यातून मांडत असल्याने कादंबरीचा व्यापक आशय ठळक होतो.

जातजाणिवांच्या टोकदार राजकारणाचा विचार करताना मल्हार स्वत:च्या कुणबी-मराठा जातीचेही आंतरसंबंध व



अनुक्रमणिका

त्यातील उच्चनीचता कठोरपणे पुढे ठेवतो. लग्नासाठी मुलगी पाहताना ती गरीब कुणव्याचीच पाहा, पण शहाण्णव कुळी पाटलांची, पैशाच्या जोरावर आपला कुणवीपणा सोडून मराठा झालेल्यांशी सोयरिक आपल्याला परवडणारी नाही, हे वडलांना पटवून देतो. आपण आपले व्यापक कुणवीपण जपायलाच हवे, हे त्याला मनापासून वाटते. दिगंबर नाना पाटील यांच्या उदाहरणातून तथाकथित सरंजामी मराठा घरात स्त्रीला दिले जाणारे दुय्यम स्थान व तिचे होणारे शोषण अत्यंत परिणामकारकपणे दाखवून दिले आहे. मल्हारच्या भावकीतील दिगंबर पाटील या राजकारणी पार्श्वभूमी असलेल्या सरंजामी घरातील विधवा वच्छला ताईला भेटून आल्यावर मल्हारसमोर प्रश्न पडतो, की 'आपल्याच्यानं ही शहाण्णव कुळाची चिरेबंद तटबंदी तुटंल?' या वेळची अवस्था व्यक्त करताना मल्हार म्हणतो, 'डोक्यात एकाच वेळी शहाण्णव इंगळ्यांची वळवळ. नेणिवेला जीवघेणी ढसाढशी. जाणिवेत प्रचंड चावाचाव. प्रत्येक इंगळीगणिक जीवघेणी वेदना. धड सांगताही येत नाही आणि सहनही करता येत नाही.' मल्हारच्या या मोजक्या स्वगतातून संवेदनशील कुणवी तरुणांच्या सद्य:स्थितीतील भावनेलाच मुखर केल्याचे दिसून येते. मल्हारने अत्यंत तटस्थपणे स्व-जातीचे केलेले हे स्कॅनिंग मला महत्त्वाचे वाटते. काही ठराविक लोकांच्या कृतीबद्दल संपूर्ण समाजाला जबाबदार धरणे, त्यांना जातिवादी ठरवणे मल्हारला पटत नाही. लेखकाने मराठवाडा विद्यापीठ नामांतर प्रकरणाबाबत मल्हारच्या भूतकालीन आठवणीतून उलगडलेल्या प्रसंगातून संपूर्ण समाज जातिवादी असतो, या निष्कर्षाला तडा दिला आहे. मल्हारच्या गावातील आवई आणि इतर गावकरी यांनी नामांतरानंतर उसळलेली दंगल थोपवण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचा प्रसंग सुज्ञ वाचकांनी मुळापासून वाचायलाच हवा. समाजात जातिवाद फोफावून राजकारणी स्वत:ची पोळी कशी भाजून घेत असतात हे लेखकाने इथे अतिशय सूक्ष्मपणे स्पष्ट केले आहे.

बदलत्या काळात माणूस म्हणून जगणे कसे अवघड होत चालले आहे, हे स्पष्ट करताना मल्हार म्हणतो, की 'समोरच्याला माणूस म्हणून समजून घेण्याची सारासार कुवत गमावून बसलोय आपण. आजच्या जागतिकीकरणाच्या काळात यातला कोण म्हणेल मला माणसं कमवायची आहेत म्हणून? म्हणालंच कुणी, तर तो मूर्ख बापडा! पै पैचा जप करत, पै पैसाठीच मर मर मरणं, पैसाच हगणं, पैसाच मुतणं, सकाळी उठलं की पैशांच्या घाण्याला जुंपून घेणं, पैसा-पद-प्रतिष्ठा पाहूनच एखाद्याशी संबंध ठेवणं या सगळ्याचं गोंडस नाव म्हणजे प्रोफेशनल असणं. म्हणजेच का जागतिकीकरण?' जागतिकीकरणाच्या या बदलत्या रूपाचा आजच्या स्त्री-पुरुष संबंधांवर व लग्नसंस्थेवर जो परिणाम होतो आहे तो लेखकाने मल्हारच्या शिवाजी या मित्राच्या अनुभवकथनातून अतिशय बारकाईने वाचकांसमोर ठेवलेला आहे. औरंगाबाद शहरात स्थायिक झालेल्या शिवाजीची प्रेमविवाह झाल्यानंतरची स्थिती शिवाजीने मल्हारला पाठवलेल्या दीर्घ पत्रातून स्पष्ट दिसून येते. मल्हारने शिवाजीला पाठवलेली पत्रोत्तरे ही एकूणच भांडवली व्यवस्थेच्या मर्यादा आणि देशी मूल्यांची आवश्यकता स्पष्ट करतात. टोकाचा शहरी स्त्रीवाद भांडवलदारी अर्थव्यवस्थेचे अपत्य असून व्यक्तीचे, त्याच्या नात्याचे वस्तुकरण करणे व त्याला आभासी वास्तवात गुंतवून ठेवणे या व्यवस्थेला कसे गरजेचे असते हेच लेखक यातून अभ्यासपूर्ण पद्धतीने दाखवून देतो. आजच्या मुलींच्या दृष्टीनं आपण अनफिट आहोत, ही कष्टकरी समुदायातून आलेल्या शिवाजीच्या मनातील भावना हेच स्पष्ट करते. मल्हारच्या पत्रोत्तरातून लेखकाने देशी कृषिजन परंपरेचे महत्त्व पुन्हा एकदा ठामपणे मांडलेले आहे. मल्हार शिवाजीला आपल्या खऱ्या विज्ञानवादी परंपरेची व शेती संस्कृतीची गरज आजच्या बदलत्या काळात कशी महत्त्वाची आहे हे अत्यंत समंजसपणे पटवून देतो. व्यक्तीला, समूहाला पूर्वीच्या गावगाड्यात जी ओळख होती, ती या भांडवली जगतात नामशेष होत असल्याने जागतिकीकरण आल्यानंतर नव्या गंभीर समस्या कशा प्रकारे निर्माण होत आहेत हे लेखकाने त्याच्या निरीक्षणातून मांडलेले आहे. खाउजा धोरणानंतरच्या बदलात वेल्फेअर स्टेट वा नेशनची कल्पना भांडवली व्यवस्था आभासी वास्तवाद्वारे कशा मार्गाने मोडीत काढते आहे याचेही महत्त्वपूर्ण विवेचन लेखक पत्रोत्तराद्वारे वाचकांसमोर ठेवतो. जागतिकीकरण आणि त्याच्या सूक्ष्म दुष्परिणामांच्या रूपाचे विवेचन मल्हार आणि शिवाजीच्या प्रदीर्घ पत्ररूपी संवादात आल्याने कादंबरीतील हे प्रकरण लेखकाची ठाम व निश्चित अशी भूमिका समजून घेण्यासाठी अधिक उपयुक्त ठरते. यासाठी सुशीलने वापरलेला पत्राचा फॉर्म मला अधिक प्रभावी व सशक्त वाटतो. आजच्या इंटरनेटच्या जमान्यात मल्हारने व शिवाजीने जपलेले पत्ररूपी संवादाचे माध्यम हे लेखकाने अतिशय जाणीवपूर्वक योजल्याचे दिसून येते. संवाद हरवत चाललेल्या आजच्या काळात तांत्रिक प्रगतीची प्रचंड मोठी मर्यादा यातून अधोरेखित होते. टोकाच्या शहरी स्त्रीवाद्यांच्या मर्यादा दाखवून देताना लेखकाने मल्हारच्या आईच्या व आवईच्या उदाहरणातून येथील देशी मातृसत्ताक परंपरेची भूमिका अतिशय आत्मविश्वासपूर्वक व ठळकपणे स्पष्ट करून एक नवा पर्याय परंपरेशी सांधेजोड करत दाखवून दिला आहे. कादंबरीतील लेखकाच्या या भूमिकेला येथील भूमीतील मातृसत्ताक परंपरेला मूळ देशी व कृषिजन संस्कृतीचा आणि शरद पाटील यांच्या मातृसत्ताक संशोधनाचा मूलभूत आधार आहे. शरद पाटील यांच्या वाचनातून प्रगल्भ झालेला मल्हार हा भारत ही मातृसत्तेची, स्त्रीसत्तेची भूमी होती व तिच्यामध्ये समता व लोकशाही कशा प्रकारे अंतर्भूत होती हे शिवाजीला पटवून देताना परकीय भूमीवरील उसन्या भांडवली स्त्रीवादाच्या शहरी भूमिका सोदाहरण दाखवून देतो. लेखकाने मल्हारची आई, आवई यांच्या व्यक्तिरेखांतून कृषिमायेचा आदिबंध साकारून शेतीचा शोध लावणाऱ्या व आपल्या उपजत शहाणपणाच्या साहाय्याने कुटुंबाचे व गावगाड्याचे नेतृत्व करणाऱ्या व्यापक मातृसत्ताक

परंपरेचा पिढीजात वारसा अभ्यासपूर्ण पद्धतीने 'जोहार'मध्ये उलगडून दाखवलेला आहे.

प्रा. दाते मॅडम, शिवाजीची बायको, मल्हारची वहिनी, प्रा. जोशींची बायको यांच्या उदाहरणांतून लेखकाने स्त्रीचे वेगवेगळ्या पद्धतीने क्रयवस्तूमध्ये होणारे रूपांतर व ते होण्यामागे जबाबदार असलेला भांडवली बाजार यांचे सूक्ष्म तपशील मांडून केलेले अन्वेषण सद्य:स्थितीच्या बदलाकडे कसे पाहावे व हा बदल समजून घेताना त्याला काय देशी पर्याय योजावेत याकडे दिशानिर्देश केलेला आहे. यातून समग्र समाजाला पुन्हा एकदा निर्ऋति-हरिती-महदाइसा-मुक्ताई-जनाबाई-वहिणाबाई-जिजाऊ-ताराबाई-सावित्रीबाई-जनाक्का-फातिमाबी-आवई या समृद्ध देशी संचिताकडे वळण्याशिवाय पर्याय नाही, हेच अधोरेखित होते. बाजारू व्यवस्थेने स्त्री-पुरुष देहाला व्यापाराशी जोडत परकीय भूमीतील नि:सत्त्व व मूल्यरहित तत्त्वे येथे रुजवून व्यक्तिस्वातंत्र्य व समतेच्या संकुचित व चुकीच्या संकल्पना राबवल्या. येथील मातीत उगवलेल्या देशी मूल्यव्यवस्थेला आऊटडेटेड ठरवले. त्यामुळे भौतिक हव्यासामागे लागलेल्या येथील समाजाला आपल्या व्यापक, समजुतदार व मूळ विज्ञानवादी असलेल्या परंपरा ह्या कशा टाकाऊ व ऑर्थोडॉक्स वाटू लागल्या व त्यातून व्यक्ती-समाज यांच्या संबंधात काय समस्या निर्माण झाल्या याची कारणमीमांसा 'जोहार' कादंबरीत विविध घटना-प्रसंगांच्या उदाहरणांच्या माध्यमातून प्रकट झाल्याने समकालीन वास्तवावरील भाष्य समजून घेण्यासाठी या कादंबरीचे वेगळे महत्त्व आहे हे निश्चित.

आपल्या देशात पूर्वीपासून ते आजतागायत उजव्या विचारसरणीने स्वत:च्या फायद्यासाठी येथील व्यापक परंपरा संकुचित केल्याचा इतिहास आहे. कर्मठ, सोवळ्या, धर्मवादी भूमिकेने येथील भूसांस्कृतिक विविधता व खरी धर्मनिरपेक्षता लोप पावण्यास हातभार लावला, हे जरी खरे असले, तरी तद्नंतर आलेल्या भांडवलशाही पुरस्कृत पक्षीय राजकारणाने या समृद्ध वारशाची हानी केली, हेही तितकेच महत्त्वाचे. आधुनिकता ही संकल्पना व तिचा आपल्याकडे लावला गेलेला अर्थ यामुळे भयंकर मोठे गोंधळ स्वातंत्र्यपूर्व काळापासून आजतागायत निर्माण झाल्याचे दिसून येते. या अनुषंगाने कादंबरीत एके ठिकाणी नायक म्हणतो, 'मुळात आधुनिकता म्हणजे काय व ती कशाशी खातात, परंपरा व आधुनिकता यांचा मेळ कसा घालायचा, या गतिशील जीवनात आपलं चांगलं ते कसं धरून ठेवायचं, स्त्री असो वा पुरुषमाणूस म्हणून समंजसपणाने कसं सहजीवन जगायचं, दागदागिने, पै-पैसा यापेक्षा माणसं किती महत्त्वाची असतात याचंच नीट आकलन नसल्याने गोंधळ आणखीनच वाढला. हा गोंधळ आणखी वाढावा अशी तीव्र इच्छा असलेले भांडवलदार आणि व्यवस्था मात्र खूप आहेत. कारण हा गोंधळ त्यांच्यासाठी इष्टापत्तीच ठरतो आहे... आपली पिढी या गोंधळात अडकलेली आहे.'

असाच गोंधळाचा प्रकार सद्य:स्थितीला देशीवादाबाबत घडत आहे. सोवळा स्वदेशी वाद आणि कृपिजन संस्कृतीचा व्यापक देशीवाद यातील फरक येथील परिवर्तनवादी चळवळींनी व विचारांनी धडपणे समजून न घेतल्याने खाउजा धोरणाबाबत त्यांच्याकडे सुस्पष्ट असा पर्याय उभा राहू शकलेला नाही. शहरी उच्चभ्रू मध्यमवर्गीय नेतृत्वाच्या या मर्यादेमुळे त्यांचे क्षीण अस्तित्व आता नामशेष होण्याच्या दिशेने वाटचाल करते आहे. 'जोहार'मध्ये लेखकाने या कळीच्या मुद्द्याला हात घातला आहे. महात्मा फुले यांच्या 'घालमोडेदादा' या शब्दाचा समर्पक वापर करत त्याने जमिनीशी संबंध नसलेल्या आणि फक्त पुस्तकी भूगोल माहीत असलेल्या शहरी नेतृत्वावर केलेली टीका याच भूमिकेतून समजून घेणे गरजेचे आहे.

'जोहार' ही कादंबरी फक्त विद्यापीठीय वातावरणाभोवतीच घुटमळत नाही. नागर समाजाबरोबर लेखक बदलत्या गावगाड्याचे जे चित्रण करतो त्यातून ही कादंबरी समांतरपणे गाव व शहर या दोहोंतील बदल तितक्याच समर्थपणे टिपते, हे मुद्दामहून नोंदवावेसे वाटते.

विद्यापीठात एमफिलचे शिक्षण घेत असताना मिळणाऱ्या सुट्ट्यांमध्ये मल्हार गावाकडे जात असतो. त्याच्या भूतकाळातील गाव आणि सद्य:स्थितीतला बदललेला गाव हा लेखकाने कॅमेराच्या डिझॉल्व, क्लोजप्स, लाँगशॉट व मोंताजच्या नजरेतून प्रभावीपणे टिपलेला आहे. पश्चिम महाराष्ट्रातील आणि त्याच्या जन्मभूमी असलेल्या मराठवाड्यातील प्रादेशिक असमतोल पाहून मल्हारच्या मनात प्रश्न पडतात. स्वत:शीच चाललेल्या स्वगतपर संभाषणात तो म्हणतो, 'काय आहे मराठवाड्यात? चांगलं शिक्षण? पायाभूत सुविधा? रोजगाराच्या संधी? मुबलक पाणी? चांगले रस्ते? जमीन उत्तम, पण पाणी नाही. कसा तरी पसाभर पाऊस पडला तर शेती उत्पन्नाला चांगला भाव नाही...हताश व मरू घातलेला बळीराजा मात्र आहे. पाचवीला पुजलेला दलित-सवर्ण वाद आहे. आपल्याच राजकारणात मश्गूल असलेले राजकारणीही चिक्कार आहेत. चौकाचौकांत गुटखा चघळत, लाल थुंकीच्या पिचकाऱ्या मारत उभे असलेले बेकार व विकल तरुणांचे तांडे आहेत. आता तर अतिरेकीही तयार होतायत म्हणे. मग का नाही चांगले तरुण क्रीम पुण्या-मुंबईत येणार? आधी निजामाने खाल्लं, रझाकारांनी लुटलं आता? की निजामच बरा होता म्हणायचा?' लेखकाने कादंबरीतील अशा प्रकारच्या छोट्या छोट्या संवादांतूनही ग्लोबलायझेशन नावाच्या तथाकथित संकल्पनेचा बुरखा अतिशय प्रभावीपणे अल्पाक्षरी शब्दांत उतरवलेला आहे. एके ठिकाणी मल्हार म्हणतो, 'म्हणून तर सर्कार मराठवाड्यातल्या रस्त्यांवर डांबर टाकत नाही. डांबर फक्त कागदावरच पडतं. कागदावरनं कुणाकुणाच्या खिशात. म्हणजे कुणाकुणाचे खिसे, हात- असं काय काय काळं काळं होतं. मराठवाड्याच्या मागासपणाचं खरं रहस्य या 'काळे'पणातच दडलेलं आहे.'

मराठवाड्यात कायम पडणाऱ्या दुष्काळाचे भीषण वास्तव लेखकाने अतिशय गंभीरपणे 'जोहार'मध्ये मांडले आहे. जनावरे पाण्यावाचून मरत असताना धरणाचे पाणी धनदांडग्यांच्या व राजकारण्यांच्या शेताला, उद्योगाला जात असल्याचे पाहून मल्हार आत्यंतिक कळवळ्याने उद्‌गारतो, की 'धरणं म्हणजे आपल्यासारख्या लोकांच्या पाण्याची सोय नसती, तर पुढारी, कारखानदार, पैसेवाले अशा गब्रू लोकांची सोय असती. त्यांच्या सोईसाठी आपण आपलं घरदार, जमीन, गावगाडा असं सगळं त्यात घालून भिकारी व्हायचं. म्हणजे कायदेशीरपणे भिकेला लागायचं.'

म्हणूनच प्रादेशिक असमतोलामागचे राजकारण त्याला उच्चाटन पर्व, हद्दपार पर्व वाटते. शहरे म्हणजे खेड्यांचे रक्त शोषून घेणाऱ्या भांडवलदारांच्या रखेल्या आहेत, असे तो अत्यंत कडवटपणे म्हणतो. त्याच्या संवेदनशील मनात हा कडवटपणा का निर्माण झाला याचा लेखकाने घेतलेला शोध म्हणजे 'जोहार' ही कादंबरी होय. ग्राम परिसरातील ग्रामपंचायत, पंचायत समिती, झेडपी, सहकारी साखर कारखाने यातील राजकारणी व भ्रष्ट बहुजन अधिकारी, वाढत जाणारी व्यसनाधीनता, जातिवाद, धर्मांधता, बेगडी आधुनिकता, शेतीविषयक चुकीची धोरणे व यात बळी जाणाऱ्या शेतकऱ्यांची व त्यांच्या कुटुंबांतील तरुण पिढीची विदारक वस्तुस्थिती लेखकाने अत्यंत भेदकपणे व स्पष्टपणे 'जोहार'मध्ये मांडलेली आहे. मल्हारचा मित्र असलेल्या सायवा सोळंकेच्या संशयास्पद मृत्यूच्या उदाहरणातून हे वास्तव भयावह पद्धतीने आपल्या समोर येते. राजकारणात वावरणाऱ्या सायव्याशी चर्चा करताना मल्हार म्हणतो, '...पण सायव्या, शेतकरी कुटुंबातून, ग्रामीण भागातून किंवा बहुजन समाजातून आलेल्या पुढाऱ्यांची-अधिकाऱ्यांची संख्या तुला काय कमी वाटतीय व्हय? आज ह्येंचीच संख्या कधी नव्हे इतकी जास्त आहे, तरीही ग्रामीण भागाचे निदान मूलभूत तरी प्रश्न सुटलेत का? एकदा का सत्ता, पद हातात आलं की पैसा, प्रसिद्धीच्या पुढे भल्याभल्यांची तत्त्वं झक मारतेत! हीच आपली वाटणारी गोरगरिबांची-शेतकऱ्यांची पोरंपोरी मागं ढुंकूनही बघत नाहीत. पुढारी- मग तो गरीब, श्रीमंत, शेतीवाला- कुठल्याही जातीचा असू दे, फक्त त्याला मनातून हा देश, हा समाज माझा आहे व त्याच्या भल्यासाठी मी निवडून आलोय आणि मला मिळणाऱ्या प्रामाणिक उत्पन्नातून मी माझं घर चालवीन, हेच माझं कर्तव्य आहे, असं जोपर्यंत आतून वाटत नाही तोपर्यंत या देशात असंच चालू राहणार. तुझ्यामुळे आणखी एकाची भर, फार काही नाही.'

बारोमास, तहान आणि ब-बळीचा या कादंबऱ्यांनंतर 'जोहार' या सुशीलच्या कादंबरीमधूनच बदलते ग्रामवास्तव अधिक भेदकपणे समोर आल्याचे दिसते.

गावच्या अस्वस्थ तरुण पिढीचे जिवंत चित्रण लेखकाने मल्हारच्या भावाच्या उदाहरणातून स्पष्ट केले आहे. बीएड झालेल्या मल्हारच्या भावाला गावाकडील कॉलेजवर सीएचबीवर काम करावे लागते. कायमस्वरूपी नोकरीसाठी लाखोंनी पैसे भरल्याशिवाय तरणोपाय नाही आणि मल्हारच्या घरची तितकी आर्थिक परिस्थिती नाही. मल्हारचे वडील ज्या शिक्षणसंस्थेत शिक्षक होते त्या संस्थेत मल्हारच्या भावाच्या नोकरीचे काम होऊ शकत नाही. कारण ज्या अण्णांनी मल्हारच्या वडलांना केवळ गुणवत्तेवर आणि परिस्थिती पाहून ज्या काळात नोकरीवर घेतले, तो खऱ्या अर्थाने उदार असलेला कालखंड संपलेला आहे. आता अण्णांच्या जागी त्यांची नवी पिढी आलेली आहे. याबद्दल मल्हार आणि त्याच्या भावाला सद्यःपरिस्थिती सांगताना वडील म्हणतात, 'अण्णा गेले आन् सगळंच बदललंय तिथं. त्येंचा पोरगा पैशावगर क्षुल्लक कामदेखील करत नाही. त्याला वयानं लहान-मोठं माणूस पाहून बोलायलासुदीक कळत नाय. कुणाचा कुठंबी पानउतारा करतंय. बापानं मिळवलेली पोरगं घालीवतंय. एकदा मी तुझ्या नवकरीबद्दल तसं बोलून बघितलं, तर मला म्हन्ला, गुर्जी, तुमाला झेपणार नाही. तुमची आयपतबी नाही. आता तर बोलतबी नाही. मग कशाला त्येच्या मागं लागायचं?'

येथे भांडवली व्यवस्थेने बदललेल्या मूल्यभावावर लेखकाने अतिशय परिणामकारक भाष्य केलेले दिसून येते. जागतिकीकरणाचे परिणाम खेड्यापेक्षा महानगरातच अधिक तीव्रतेने जाणवतात, असे म्हणणे किंवा वाटणे हा अज्ञानाचा भाग आहे, असे म्हणता येते.

'जोहार'मध्ये मुंडासा बांधलेल्या म्हाताऱ्याचे आलेले प्रकरण हे लेखकाच्या वैचारिक प्रवासाचे, अभ्यासाचे, चिंतनाचे व अनुभवांचे घोटीव व परिपक्व रूप आहे असे म्हणता येते. मल्हारच्या जाणीव-नेणिवेच्या संवेदनशीलतेचा हा आलेख कादंबरीची मौलिकता शतपटीने वाढवत असल्याने मला हे प्रकरण अतिशय महत्त्वाचे वाटते. मुंडासे बांधलेला म्हातारा हा आजच्या अगतिक शेतकऱ्यांचा जाणता प्रतिनिधी म्हणून वाचकांसमोर येतो. या प्रकरणाचे विश्लेषण आपल्याला प्राच्यविद्यापंडित शरद् पाटील यांनी वापरलेल्या जाणीव-नेणीव या संकल्पनांनुसार समजून घेणे महत्त्वाचे ठरते. पाटील यांच्या संशोधनानुसार मनाच्या जाणीव व नेणीव या द्वैताचा प्रमाणशास्त्रात समावेश करून त्याचा तर्कशास्त्रात विकास करायचे युगप्रवर्तक काम सर्वप्रथम दिग्नाग स्कूलने केले. मनाच्या द्वैताचा शोध प्रथम सांख्ययोगिनींनी लावला आणि वसुबंधूने त्याची नोंद त्याच्या अभिधर्म कोशात चित्त-संप्रयुक्त (जाणीव) व चित्तविप्रयुक्त (नेणीव) या नामकरणाने केली. या चित्तद्वैताचा दर्शनात प्रमाणशास्त्रीय समावेश वसुबंधूचा महाशिष्य दिग्नाग याने त्याच्या सौत्रांतिक विज्ञानवादात सविकल्प (जाणीव) व निर्विकल्प (नेणीव) या नावाने केला (संदर्भ : शरद पाटील - मातृसत्ता-स्त्रीसत्ता आणि भारतीय समाजवाद). अर्नोल्ड टॉइन्बी व दैसाकू इकेडा हे उदारमतवादी भांडवलदारी विचारवंतही यावर चर्चा करतात; परंतु त्याला मर्यादा पडतात, हे पाटील येथे दाखवतात. टॉइन्बीच्या मते

काव्याचा व धार्मिक अंतदृष्टीचा स्रोत नि:संशयपणे नेणीव असते. भावोद्रेक व ऊर्मी यांचाही स्रोत नेणीव असतो. चौथ्या शतकातच असंग व वसुबंधू या तत्त्वज्ञानाच्या विज्ञानवादी संप्रदायाच्या विचारवंतांनी ज्ञानेंद्रियाच्या पारंपरिक सहा दृक्, ध्वनी, गंध, स्वाद, स्पर्श व मन या संकल्पनांत जाणीव-नेणिवेची भर टाकून देकार्तच्याही आधी महत्त्वपूर्ण अशी मानवी व्यवहाराची खोलवर चिकित्सा केली (संदर्भ : शरद पाटील- 'मातृसत्ता-स्त्रीसत्ता आणि भारतीय समाजवाद'). अशा या ऐतिहासिक जाणीव-नेणीव या मानवी मनाशी संबंधित महत्त्वपूर्ण संकल्पनांच्या साहाय्याने आपण 'जोहार'मधील मुंडासे घातलेला म्हातारा हा मल्हारच्या नेणिवेचा भाग असल्याचे लक्षात घेतल्यास कादंबरीतील मल्हार आणि मुंडासा घातलेल्या म्हाताऱ्याचा होणारा संवाद आपण अधिक योग्य पद्धतीने समजून घेऊ शकतो. येथे मल्हार या पात्राची व लेखकाची जाणीव-नेणीव आपण वेगळी काढू शकत नाही. किंबहुना कादंबरीतील मल्हार हा नायक लेखकाचा प्रोटोगनिस्ट म्हणूनच ठळक होतो. आजच्या काळातील शेतकऱ्यांच्या आत्महत्यांमागील मूलभूत कारणांची लेखकाने त्याच्या जाणीव-नेणिवेच्या माध्यमातून केलेली मीमांसाच वाचकांसमोर उभी राहते. संवेदनशील मल्हारच्या देशी जाणीव-नेणिवेच्या कार्यकारणभावातून मुंडासे घातलेल्या म्हाताऱ्याचे प्रदीर्घ स्वगत उलगडत जाते. कादंबरीत चिमू या आपल्या भाचीला महात्मा फुले यांच्याबद्दल सांगितल्यानंतर स्वगतपर बोलताना मल्हार म्हणतो, 'आज पुढारी स्वत:च्या शेतीसाठी, कारखान्यांसाठी शासनाच्याच (यासाठी कित्येक गोरगरीब शेतकऱ्यांच्या जमिनी, घरं धरणाखाली गेलेली असतात.) धरणातलं पाणी पळवतायत. इतकं कशाला, जागतिकीकरणामुळे आधुनिक झालेले लोक हल्ली पाणी बाटलीत घालून, विकून पाण्यासारखा पैसा करून गब्बर होतायत. तेव्हा, फुल्यांचं टीव्हीवर येणं हे टीव्हीवाल्यांना तर परवडणारं नाहीच, शिवाय आजच्या व्यवस्थेलाही परवडणारं नाही. आणि आलेच खरोखर तर आज हे जे चाललंय ते पाहून त्यांना किती किती आणि कुणाकुणावर आसूड ओढावे लागतील याची गणनाच करता येणार नाही. त्या काळात तरी त्यांना अन्यायी ब्राह्मणी व्यवस्थेवर आसूड ओढावा लागला. पण आता प्रस्थापितांबरोबरच आपल्या बहुजन समाजातील वाईट प्रवृत्तींवर आसूड ओढायचा म्हणजे... बाप रे बाप! फुलेकाका तुम्ही येऊच नका!' अशा प्रकारे मल्हारच्या जाणीव-नणिवेत फुल्यांचे अस्तित्व असणे, फुल्यांचे समग्र वाचन त्याने केलेले असणे आणि मुंडासा घातलेला म्हातारा त्याच्या स्वप्नात येणे याचा कार्यकारणभाव आपल्याला लावता येऊ शकतो. मल्हारच्या याच जाणीव-नेणिवेच्या साहाय्याने कादंबरीतील मल्हारची स्वगते आपण अधिक बारकाईने समजून घेऊ शकतो.



**जोहार**
**सुशील धसकटे**
**अक्षरवाङ्मय प्रकाशन, पुणे**
**पृष्ठे : ३३१**
**मूल्य : ३०० रु.**

सुशीलच्या कादंबरीतील भाषाशैलीवर महानुभाव, वारकरी, फुले, वि. रा. शिंदे ते नेमाडे यांच्या लेखनशैलीचा प्रभाव जाणवतो. कादंबरीतील प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी महानुभाव गद्यशैलीच्या प्रभावातून लिहिलेल्या आधुनिक लीळा हे 'जोहार' या कादंबरीचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य मानावे लागेल. लीळा या पारंपरिक फॉर्ममधून सद्य:कालीन परिस्थितीवर सुशीलने केलेले अल्पाक्षरी व नेमके भाष्य या कादंबरीची उंची व समृद्धता वाढवण्यात मोलाची भर घालते. लीळेच्या माध्यमातून व्यक्त होताना आपल्या परंपरेशी स्वत:ला जाणीवपूर्वक जोडून घेणे, हे लेखकाच्या ठाम व अभ्यासपूर्ण देशी भूमिकेचे एक भरभक्कम संचित म्हणून समोर येते. आधुनिक लीळांचा कादंबरीत केलेला वापर हा केवळ प्रयोगासाठी म्हणून केलेला प्रयोग वाटत नाही, तर या लीळा म्हणजे लेखकाच्या जाणीव-नेणिवेचा गाभाच आहे, असे म्हणता येते. महानुभाव व वारकऱ्यांच्या सामाजिक प्रबोधनाच्या आणि बंडखोरीच्या एका समृद्ध परंपरेच्या आविष्काराचा तो पुनरुच्चार आहे, असे मला वाटते. स्वत:च स्वत:शी केलेल्या या आत्मसंवादातून लेखकाने निर्मिलेल्या या लीळा भाषासौष्ठवाच्या दृष्टीने मला महत्त्वाच्या वाटतात. लीळा या फॉर्मचे आजच्या काळात इतक्या अप्रतिम पद्धतीने व्यक्त होणे हे केवळ तुमच्या हाडीमासी एकरूप झालेल्या महानुभाव गद्याच्या अभ्यासातून व प्रेमातूनच शक्य आहे. लेखकाची निश्चित अशी भूमिका समजून घेण्यासाठी या लीळा मार्गदर्शक ठरतात. संक्रमण अवस्थेतील शहरे व खेडी या भिन्न टोकांच्या सद्य:कालीन वाटचालींवरचे अचूक भाष्य व सकारात्मक आशावाद या आधुनिक लीळांतून व्यक्त झाला आहे.

'जोहार'चा लेखक मूळ मराठवाड्यातील असल्याने तेथील स्थानिक बोलीभाषेचा संपन्न आविष्कार आपणाला संपूर्ण कादंबरीत आढळून येतो. निजाम राजवटीमुळे मराठी आणि उर्दूमिश्रित हिंदी भाषेचाही प्रभाव लेखकाच्या शैलीवर आहे. उदा० टूटता तारा, मावेजा, अपना वट, गमजा, चैन की नींद, अरमान, यांसारख्या अनेक शब्दांच्या वापरातून हे लक्षात येते. या शब्दांच्या वापरातून कादंबरीच्या भाषावैशिष्ट्यांत सुंदर भर पडलेली आहे. मराठवाड्यातील ग्रामीण व्यवहारात रुळलेले कोरकुटका, यखाट्या, कुटका, झिंगाड, बाइलबुधलं, किटान, झिंगाट, पंगणपसारा, गेवाने, मिर्चू, जवारी, चुंगडं, लाडवं, गंडल या शब्दांचाही फार समर्पक वापर कादंबरीत केलेला आढळतो. सुशीलने स्वत:चे काही शब्द उच्चारानुसार कादंबरीत वापरलेले आहेत. प्रमाणभूत मराठी व्याकरणानुसार हे शब्द वापरण्यापेक्षा त्याने अशा प्रकारे वेगळ्या पद्धतीने हे शब्द वापरून एक वेगळीच भाषिक गंमत यातून साधलेली आहे. उदा० झोप्लो, कर्णार, प्रकर्ण, पर्वडला, आंतर्देशी, बोल्तोस, नुस्ता, घर्लं, म्हण्ल्यावर, सर्कार, गेल्तो, बोल्तोय, माघल्दीच,

झक मार्ली, इ० या शब्दांप्रमाणेच तो स्वत: घडवलेला 'खारखेळ'सारखा नवीन शब्दही योजतो. नेमाड्यांच्या 'कोसला' शैलीचे वगैरे वगैरे, हे एक भलतंच, हे शब्दही कादंबरीत येतात- पण ते चूस किंवा अंधानुकरण म्हणून येत नाहीत. सकारात्मक प्रभावाचा भाग म्हणून याकडे आपण पाहिले पाहिजे. कादंबरीच्या सुरुवातीच्या प्रकरणात एकाकी मल्हारला त्याच्या नेणिवेत दडून बसलेला पांडुरंग सांगवीकर फर्ग्युसन कॉलेजमध्ये भेटण्याचा प्रसंग सुशीलने अतिशय कल्पकतेने व विशिष्ट भूमिकेतून योजून नेमाड्यांचा पांडुरंग सांगवीकर वाचकांसमोर अक्षरश: जिवंत उभा केला आहे. पांडुरंगच्या व्यक्तिमत्त्वाचा आंतरिक गाभा नेमक्या अचूकतेने टिपत कादंबरीमध्ये मल्हारला त्याचा समधर्मी भेटण्याचा व त्याच्याशी त्याचा संवाद होण्याचा प्रसंग लेखकाने अतिशय अर्थपूर्णरीतीने पेश केला आहे. एकंदरच, या कादंबरीच्या विचारविश्वावर भालचंद्र नेमाडे यांच्या देशीवादी भूमिकेचा असलेला संस्कार मल्हारच्या परंपरेतून सत्त्वयुक्त संचित स्वीकारत जाण्याच्या सकारात्मक मनोभूमिकेतून आलेला आहे, हे येथे लक्षात घेणे अतिशय महत्त्वाचे आहे. त्यामुळे मल्हार हा पांडुरंग सांगवीकरची किंवा 'जोहार' ही 'कोसला'ची कॉपी वाटत नाही. लेखकाने मल्हारचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व अत्यंत ताकदीने उभे केल्याने तो आजच्या तथाकथित ग्लोबलाइज युगाचा संवेदनशील व तीव्र नैतिक भान असलेला खराखुरा तरुण चेहरा वाटतो नि त्याच्या प्रवासाची हकीकत व्यक्त करणारी 'जोहार' ही लेखकाची स्वतंत्र ओळख निर्माण करणारी महत्त्वपूर्ण कलाकृती म्हणून वाचकांच्या मनावर ठसते.

सुशीलने 'जोहार' हे अस्सल देशी भान व्यक्त करणारे शीर्षक आपल्या कादंबरीला देऊन आजच्या काळात त्याच्यापरीने केलेला छोटासाच पण मोलाचा कृतियुक्त हस्तक्षेप मला अत्यंत महत्त्वाचा वाटतो. संत चोखामेळाच्या भावनेशी एकरूप झालेला व साठ हजार वर्षांची परंपरा लाभलेला हा शब्द रा. भालचंद्र नेमाडे यांनी खऱ्या अर्थाने पुन्हा एकदा बोली व्यवहारात रूढ करण्याचा प्रयत्न केलेला आहे. अशा या समृद्ध परंपरेच्या संचिताचा शीर्षक म्हणून केलेला वापर हा याच कादंबरीतील एका प्रकरणातून लेखकाने उलगडून दाखवलेला आहे. त्यासाठीसुद्धा ही संपूर्ण कादंबरी बारकाईने वाचायलाच हवी.

◆

भूषण राक्षे
चलभाष : ९८६०९३७२४६

◆

सुशील धसकटे
चलभाष : ८८५७८९१८०५



विशेष लेख

बालाजी सुतार



# मुरली खैरनार एक तेजस्वी 'शोध'प्रवास

**मुरली खैरनार यांच्या निधनाने मराठी साहित्यविश्वातला एक प्रयोगशील प्रतिभावंत लेखक काळाच्या पडद्याआड गेला आहे. अलीकडेच राजहंस प्रकाशनातर्फे प्रसिद्ध झालेली त्यांची 'शोध' ही थरार कादंबरी बहुचर्चित ठरली आहे. या कादंबरीच्या लिखाणासाठी खैरनार यांनी केलेले इतिहास संशोधन मौलिक आहे. खैरनार यांच्या अभ्यासू व्यक्तिमत्त्वाचे काही पैलू उलगडतानाच या कादंबरीच्या अंतरंगावर प्रकाश टाकणारा कवी-कथाकार बालाजी सुतार यांचा लेख.**




मुरली खैरनार गेले. एका शोधप्रवासाची अखेर झाली. मराठी साहित्यविश्वाला एका चौफेर व्यासंगी अवलिया लेखकाचा शोध लागता लागताच हा कलंदर शोधयात्री दिगंतरापल्याडच्या शोधयात्रेला गेला, हे काही बरं झालं नाही. अजिबातच बरं झालं नाही.

'चव्हाटा' या फेसबुक समूहावर आमची मैत्री झाली. अनेक वेळा संवाद झाला. काही वेळा वादही झाले. त्यांचा अभ्यास आणि आमचा आडमुठेपणा, अशी जुगलबंदीही काही वेळा झाली. प्रत्येक वेळी लक्षात आलं की हे रसायन काही वेगळंच आहे. क्षुल्लक वादावादीवरून इतरांना धारेवर धरणारे, अन्फ्रेंड किंवा ब्लॉक करणारे अनेक ज्येष्ठ-श्रेष्ठ प्रतिभावंत फेसबुकवर वावरत असतात. त्या पार्श्वभूमीवर खैरनार यांचे उमदेपण अधिक ठसठशीतपणे जाणवत असे. मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्याचा विषय असो की क्षुद्र स्वार्थासाठी आपापल्या सोयीच्या इतिहासाचे वर्तमानात माजवले जाणारे स्तोम असो, कुठल्याही विषयावर त्यांची स्वत:ची अशी एक खास मांडणी असायची. ती खोडून काढणे हे 'महाकठीण कर्म' वाटावे इतकी ती मांडणी पक्की असायची. त्यांच्या लेखनाचा, आकलनाचा आणि चिंतनाचा प्रचंड आवाका लक्षात आल्यावर मी त्यांच्या पोस्ट्सकडे अधिक गंभीरपणे पाहू लागलो. कुठल्याही चर्चेत त्यांचा तोल ढळला नाही. कुणाच्या विसंगत शेरेबाजीने ते विचलित झाले नाहीत किंवा त्यांनी कधी कुणाबद्दल आकस बाळगला आहे असेही कधी जाणवले नाही. अभ्याससिद्ध अशी स्वत:ची पक्की मते बाळगणारे ते कुणाच्या अज्ञानाला हिणवून हसल्याचे कधी दिसले नाही. अत्यंत उमदा, अत्यंत अभ्यासू आणि ठोस मांडणी करतानाही अत्यंत लवचिक दृष्टिकोन, असा त्यांचा एकुणात वावर असे.

एका संध्याकाळी त्यांचा मेसेज आला, की उद्या अंबाजोगाईत येतोय. भेटू यात. दुसऱ्या सकाळी अगदी सूर्योदयाच्या सुमारास आद्यकवी मुकुंदराजांच्या समाधिस्थळी आम्ही भेटलो. तिथल्या डोंगरदरीतून इकडे-तिकडे हिंडलो. नंतर गावात येऊन त्यांचे जुने मित्र असलेल्या अमर हबीब यांच्या घरी गेलो. मग त्यांचे 'शोध'चे लेखन आणि त्यासाठीचा त्यांचा अभ्यास, प्रवास, निरीक्षणे, नोंदी या गोष्टींवर गप्पा झाल्या. या भेटीतही या माणसाच्या अभ्यासातले पक्केपण आणि स्वभावातली ऋजुता पुन:पुन्हा जाणवत राहिली.

नंतर अधूनमधून फोनवरून, मेसेजेसमधून आम्ही बोलत राहिलो- पण त्यात फारसे सातत्य नव्हते. 'शोध'च्या संदर्भात केलेल्या डायरी स्वरूपातल्या नोंदी ते नेमाने पोस्ट करीत असत. लेखनप्रक्रियेविषयीचे त्यांचे विचार, त्यातल्या अडचणी, त्यातून काढलेले मार्ग या संदर्भातल्या या नोंदी असत. त्या नोंदींच्या माध्यमातून मी त्यांना वाचत मात्र राहिलो. अनेकदा अवाक होत राहिलो. एका लेखकाने आपल्या कादंबरीसाठी एवढा प्रवास, अभ्यास, चिंतन, परिशीलन, चर्चा करणे (स्वत: कॅन्सरसारख्या दुर्धर व्याधीने ग्रासलेले असताना त्याचा कुठेही उल्लेख न करता, त्यातून होणाऱ्या मृत्युदर्शनाचे विक्राळ ओझे सहजी झुगारून



अनुक्रमणिका

देऊन), त्यासाठी अफाट असे कष्ट उपसणे हा प्रकार निदान मराठीत यापूर्वी क्वचितच घडलेला असेल. लेखकाने आपल्या लेखनप्रक्रियेबद्दल लिहून ठेवणे आणि त्या नोंदी सर्वांसाठी खुल्या ठेवणे ही गोष्ट आपल्याकडे फारशी झालेली नाही. सामान्यपणे लेखक आपल्या साहित्यकृतींबद्दल बोलताना दिसतात. ती कृती घडताना आपल्या स्वत:मध्ये काय प्रकारचे मंथन घडले, कुठल्या प्रोसेसमधून जावे लागले यासारख्या गोष्टींबद्दल बोलताना-लिहिताना कुणी दिसत नाहीत. मुरली खैरनारांनी या संदर्भात केलेल्या नोंदींचे एक स्वतंत्र पुस्तक यावे, एवढ्या त्या नोंदी महत्त्वाच्या आहेत.

यथावकाश 'शोध' प्रसिद्ध झाली. मराठीतली पहिली अस्सल थरारकथा असा तिचा लौकिकही झाला. मला अर्थातच अंबाजोगाईमध्ये ही प्रत मिळाली नाही. कधी तरी पुण्याला गेल्यावर ती विकत घेऊ असे मनाशी म्हणत होतो, पण पुण्याला जाणे या ना त्या कारणाने लांबणीवर पडत गेले. त्यानंतर ही कादंबरी वाचण्याचा योग आता नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात आला. मित्रवर्य महेंद्र मुंजाळ यांनी कादंबरीची प्रत पाठवली आणि 'यावर काही लिही' असे सुचवले. दोन-तीन रात्रींत झपाटल्यासारखी मी ती वाचत होतो. ही कादंबरी लिहिण्यासाठी केवढा अभ्यास केला आहे, केवढे परिश्रम घेतले आहेत याची साक्ष 'शोध'च्या पानापानांतून प्रत्ययाला येते. काय नाही या कादंबरीत? ऐतिहासिक सत्य आणि समकालीन कल्पिताची अत्यंत अद्भुत अशी सरमिसळ इथे वाचायला मिळते. यात शिवकालीन इतिहासाचे आजवर अज्ञात असलेले पदर आहेत, नाशिकच्या परिसरातल्या भूगोलाचे अत्यंत सूक्ष्म बारकावे आहेत; लॅपटॉपपासून जीपीएसपर्यंत, हेलिकॉप्टर ते थेट ड्रोन विमानांपर्यंत अनेक प्रकारच्या अत्याधुनिक तंत्रज्ञानाची, उपकरणांची, त्यांच्या वापराची अत्यंत अभ्याससिद्ध अशी उदाहरणे आहेत; थरारक पाठलाग आहे, पंचवीस लाख कोटींच्या शिवकालीन खजिन्याच्या शोधार्थ आजच्या लोकांनी थंडपणे केलेल्या हत्या आहेत; डोंगरभागातल्या आदिवासींचं जगणं, त्यातल्या (कदाचित आजवर अंधारातच राहिलेल्या) प्रथा-परंपरा-देव-देवस्कीचं विलक्षण दर्शन आहे, राजकीय-पोलिसी यंत्रणांचे आणि जबरदस्त ताकद बाळगून असलेल्या उद्योगसमूहांचे लालसांनी बरबटलेले अमानुष चेहरे आहेत. वाचकाला विस्मयचकित करून सोडणारे आणखीही बरेच काही आहे.

'कुसुमाग्रज प्रतिष्ठान (नाशिक)' यांच्याकडून एक लाख रुपयांची अभ्यासवृत्ती लाभलेल्या आणि राजहंस प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या या कादंबरीच्या निमित्ताने ऐतिहासिक घटना आणि समकालातले काही काल्पनिक पदर यांचा अत्यंत रोचक पद्धतीने विणलेला असा गोफ अगदी पहिल्यांदाच मराठी वाचकांच्या समोर आला आहे. कादंबरीची सुरुवात होते ती उपोद्घाताने. शिवाजी महाराजांनी सुरत या शहराची एकूण दोन वेळा लूट केली. पैकी इ. स. १७६० मध्ये दुसऱ्या लुटीच्या वेळी सुरतेतून मिळवलेली अपरंपार संपत्ती दोन भागांत विभागून त्यातला एक भाग स्वराज्यात घेऊन येणाऱ्या गोंदाजी नारो या मराठा सरदाराला मुगलांनी गाठले. निसटण्याचा कोणताही मार्ग उरलेला नसलेल्या गोंदाजीने सात हजार जनावरांवर लादलेला तब्बल अकराशे टन एवढ्या वजनाचा, बघणाऱ्याची छाती दडपून टाकेल इतका संपन्न असा हा खजिना नाशिकजवळ सप्तशृंगीच्या परिसरात कुठे तरी दुर्गम जागी लपवून ठेवला. नंतर झालेल्या लढाईत गोंदाजीचे बहुतेक सगळे सैन्य मारले गेले. जखमी अवस्थेतल्या गोंदाजीला जिवंतपणे कैद केले गेले. या संपत्तीचा ठावठिकाणा शोधण्यासाठी मुगलांनी त्याचा प्रचंड छळ केला; पण गोंदाजीने तोंड उघडले नाही. कैदेत असताना सोबत असणाऱ्या आणि लवकरच सुटून जाणाऱ्या एका इंग्रज कैद्याजवळ गोंदाजीने एक सांकेतिक नकाशा तयार करून दिला आणि तो शिवाजी महाराजांकडे पोहोचवायला सांगितले. पण हा कैदी सुटून गेल्यावर त्याला तातडीने इंग्लंडला जावे लागले. नंतर गोंदाजीही कैदेतच मरून गेला. तो नकाशा शिवाजी महाराजांपर्यंत कधीच पोहोचला नाही. त्या नकाशाचे काय पुढे झाले, ती अपरंपार संपत्ती नेमकी कुठे लपवली आहे याचा शोध आणि हा शोध घेणारी आजची माणसे, त्यांच्यातला निर्मम संघर्ष, त्या संघर्षातला थरार या गोष्टी केवळ वाचूनच अनुभवता येण्यासारख्या आहेत. सबंध कथानक इथे सांगण्याचे कारण नाही, पण या इतिहासात घेऊन जाणाऱ्या उपोद्घाताची पाठपोट दोन पाने संपल्यानंतर कादंबरी थेट तीनशे सत्तेचाळीस वर्षांचा प्रदीर्घ काळ ओलांडून वर्तमानात (खरे तर भविष्यात) ३० नोव्हेंबर २०१७ या दिवसाला भिडते आणि वाचकाला खिळवून ठेवणाऱ्या एका अत्यंत वेगवान घटनाचक्राची सुरुवात होते. ३० नोव्हेंबरला चालू झालेले हे चक्र ४ डिसेंबर २०१७ या दिवशी स्थिरावते. एक रोमांचक 'शोध' संपलेला असतो. अवघ्या पाच दिवसांचा हा शोध एकूण चारशे सत्याण्णव पानांवर 'मांडत' असताना त्यातले कंगोरे, त्यातली अमानुषता, विलक्षण तणावातल्या माणसांच्या भाव-भावनांचे अद्भुत ताणेबाणे, त्यांची निर्दय तटस्थता, लक्ष्य गाठण्याप्रतिची अविचल निष्ठा, उत्स्फूर्तपणे उसळून येणारे प्रेम आणि तरीही बाळगावा लागणारा सावधपणा, थंड डोक्याने घडवल्या जाणाऱ्या हत्या, एकमेकांवर कुरघोडी करण्याच्या प्रयत्नांतलं हिंस्रपण अशा अनेकानेक पैलूंनी घडलेली शोधकथा हा वाचकाला त्या अवकाशात पुरता गुंगवून टाकणारा एक अप्रतिम वाचनानुभव आहे. पिढ्यान्पिढ्या या संपत्तीचा शोध घेणारा 'खोजनार' समाज, खजिन्याच्या शोधार्थ आज अवाढव्य शक्ती लावलेला 'स्कायलार्क' हा प्रचंड मोठा उद्योगसमूह; शौनक, केतकी, आबाजी, विक्रांत देशमुख, जयंत, धवल, राकेश, नीरज ही यातली परस्परविरोधी गटांतली माणसे, त्यांचे साथीदार, यांच्या किंवा त्यांच्या बाजूने काम

करणारी लालची पोलिस यंत्रणा; नाशिकमधले गुंतागुंतीचे गल्ली-बोळ आणि सप्तशृंगीच्या सात डोंगरांची माळ; तिथले गड-किल्ले, दऱ्या, साडेतीन-चार हजार फुटांवर हवेत अधांतरी स्थिर केलेले हेलिकॉप्टर, चॉपर्स, जमिनीच्या गर्भाचे वेध घेणारे अत्याधुनिक सेन्सर्स, कधी तीस फूट खोल डोहात तर कधी हजारो फूट उंचीवरच्या दुर्गम डोंगराच्या कपारीत जाऊन शोध घेणे, असल्या अनेक कल्पनातीत प्रसंगांची मालिका! 'ऑथेंटिक, अनबिलिव्हेबल आणि अनपुटडाऊनेबल' अशा सार्थ शब्दांत लेखक-समीक्षक संजय भास्कर जोशींनी वर्णन केलेला 'शोध' हा निर्विवादपणे चक्रावून टाकणारा एक विशाल पट आहे.

शिवकालातील अस्सल संदर्भ आणि वर्तमानातील वास्तव प्रवृत्ती यांच्या पार्श्वभूमीवर श्वास रोखून धरायला भाग पाडणारा हा पट उभा ठाकतो तेव्हा त्यातल्या विलक्षण चित्रदर्शी अशा नाट्याने वाचक स्वत: या शोधमोहिमेचा भाग होऊन जातो. आधी नकाशाचा शोध घेणे, सापडल्यावर त्या नकाशाचे लागणारे वेगवेगळे अगम्य अर्थ, आपण लावला तो अर्थ चुकीचा आहे हे लक्षात आल्यावर पुन्हा नवे अर्थ लावण्यासाठी धडपड करणे, दर वेळी नव्याने चक्रावून टाकणारा हा नकाशा वाचण्यासाठी इतिहासतज्ज्ञांची मदत घेणे, त्यातून नव्या भिंती उभ्या राहणे किंवा नवे मार्ग सुचणे, मग पुनश्च नव्या दिशेने शोधाला आरंभ करणे, ईप्सित साध्य करण्यासाठी जीव देण्या-घेण्याची क्षमता राखून असणे, अशा धोकादायक चक्रव्यूहातून मार्ग शोधत; एकीकडे साधी पण कुशाग्र बुद्धिमत्तेची आणि छातीत अफाट हिंमत असलेली केतकी देशपांडे आणि दुसऱ्या बाजूला जबरदस्त आर्थिक-राजकीय पाठबळ असलेले आवाजी आणि सर्व शक्तीनिशी त्यांच्या पाठीशी उभा असलेला स्कायलार्क हा उद्योगसमूह यांच्यातल्या अत्यंत विषम सामन्याचे अतिशय प्रत्ययदायी असे दर्शन 'शोध' मधून घडते.

ही कादंबरी लिहिण्यासाठी खैरनारांनी केलेल्या इतिहास संशोधनातून सामान्य वाचकाला आजवर अज्ञात असलेल्या काही गोष्टीही प्रकाशात आल्या आहेत. उदाहरणार्थ, अभिनव भारत संघटनेच्या अनंत कान्हेरे यांनी ज्या कलेक्टर जॅक्सनची नाशिकमध्ये हत्या केली, त्या ए.एम.टी. जॅक्सन यांच्या एकूण व्यक्तिमत्त्वाबद्दल जी माहिती 'शोध'मधून उजेडात येते ती मराठी माणसाला सर्वस्वी अविश्वसनीय वाटेलशी आहे. सामान्यपणे 'एक निर्दय ब्रिटिश अधिकारी' अशीच ओळख असलेला जॅक्सन हा जागतिक कीर्तीचा मानववंशशास्त्रज्ञ होता; इतिहास, प्राच्यविद्या आणि पुरातत्वशास्त्रातला मोठा विद्वान होता; इतिहास आणि प्राच्यविद्या या विषयांवर तेव्हाच्या सर्व हिंदुस्थानी आणि युरोपियन नियतकालिकांतून त्याने चाळीसहून अधिक लेख लिहिले. त्याची तीन पुस्तकेही प्रकाशित झाली होती... 'शोध'मधून येणाऱ्या असल्या माहितीमुळे कलेक्टर जॅक्सनची एक वेगळीच ओळख घडते. आजवर कधीही पुढे न आलेली 'खोजनार समाज' किंवा 'उद्धारक समाज' यांच्याबद्दलची माहिती असेल किंवा डोंगरभागातल्या गावकऱ्यांचे जगणे, त्यांच्या खेळा, भायाचा उत्सव, रानखळा, माउल्या वगैरे थेट निसर्गाशी नाते सांगणाऱ्या प्रथा-परंपरांचे विलोभनीय दर्शन असेल किंवा सुरतेची बाजारपेठ एवढी समृद्ध होण्यामागची 'शोध'मधून येणारी कारणे असतील, या सगळ्या गोष्टी खैरनारांच्या चौफेर अभ्यासाची साक्ष देणाऱ्या तर आहेतच, पण आजवर वाचकाला अज्ञात असलेल्या अनेक वेगळ्या पैलूंची ओळखही घडवणाऱ्या आहेत.

'थरारकथा' हा प्रकार मराठी साहित्यात यापूर्वीही आलेला आहे. शशी भागवतांनी आणि नंतरच्या काळात संजय सोनवणींनी लक्षणीय अशा थरार कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत. त्या वाचकप्रियही ठरलेल्या आहेत. ग्रंथालयांतून वाचणाऱ्या बहुसंख्य सर्वसामान्य वाचकांची पसंती 'रंजक साहित्य' हीच असते. पण कायम अभिजाततेच्या किंवा प्रयोगशीलतेच्या प्रभावाखालच्या मराठी साहित्याने आणि समीक्षेने अशा लेखनाची फारशी दखल कधीच घेतलेली नाही. 'थरार' हा कायम दुर्लक्षित राहिलेला साहित्यप्रकार 'शोध'च्या निमित्ताने पहिल्यांदाच अत्यंत ताकदीने मराठी वाचकांच्या समोर आला आहे. कुणाची इच्छा असो की नसो, मराठी साहित्यविश्वाला दखल घ्यावीच लागेल एवढे हे लेखन दमदार आहे. 'क्लास'पासून 'मास'पर्यंतच्या सर्व प्रकारच्या वाचकांना खिळवून ठेवू शकणारे आणि मराठी साहित्यविश्वाला अधिक समृद्ध करू शकेलसे थरार कादंबरीचे एक वैभवशाली दालन 'शोध'च्या निमित्ताने मुरली खैरनारांनी खुले करून ठेवले आहे हे नक्की. अवघ्या चार महिन्यांत 'शोध'ची दुसरी आवृत्ती आली, हे या कादंबरीचे व्यावसायिक यशही मुद्दाम नमूद करावे असेच आहे.

मागच्या काही महिन्यांत खैरनारांशी थेटपणे काही बोलणे झालेले नव्हते. हा लेख लिहिणे चालू असताना काही गोष्टींबद्दल त्यांच्याशी बोलायचे म्हणून तीस नोव्हेंबरला सायंकाळी मी त्यांना कॉल केला. वहिनींनी तो घेतला आणि त्या म्हणाल्या, ''मुरली हॉस्पिटलमध्ये आहे. आजारी आहे. त्याची तब्येत ठीक झाली की तुझ्याशी बोलायला सांगेन त्याला.'' मी म्हणालो, ''ठीक आहे.'' ताप किंवा सर्दी असले काही तरी किरकोळ दुखणे असेल असा माझा समज झाला होता.

सहा डिसेंबरला दुपारी गोपाल तिवारी या मित्राचा फोन आला आणि त्याने मुरली खैरनारांचे निधन झाल्याची बातमी सांगितली तेव्हा मी एवढा गडबडून गेलो की काय बोलावे तेच काही क्षण लक्षात येईना. एखादा माणूस असा एकाएकी कसा जाऊ शकतो? कसला शोध घेण्यासाठी मुरली खैरनार असे घाई करून निघून गेले? मला काही कळेचना. त्यांचे काही दुखत-खुपत असल्याचे ते कधी बोलले नव्हते. साधी सर्दी झाली तरी आम्ही त्याच्या पोस्ट्स लिहितो आणि 'गेट वेल सून' अशा कॉमेंट्स येण्याची वाट बघत बसतो. खैरनारांनी असले काही

लिहिल्याचे मला स्मरत नव्हते. धक्क्यातून बाहेर आलो तेव्हा मी घाईघाईने नाशिकला राहुल बनसोडेला फोन केला. बातमी खरी असल्याचे राहुलने सांगितले. 'त्यांना कॅन्सर होता, त्यातच पक्षाघात झाला. शेवटचे चार दिवस ते कोमात होते आणि आज सकाळी गेले,' असे राहुल म्हणाला. मनावर आणि सबंध देहभानावर केवढे जबरदस्त ओझे पेलून धरत खैरनारांनी 'शोध'चे लेखन पूर्ण केले, हे लक्षात येताना मी हादरून गेलो. आपण आजारी आहोत, तर त्याची जाहीर वाच्यता करावी, कुणी आपल्याला सहानुभूती दर्शवावी हे त्यांना अजिबात मानवणारे नव्हते. भोवतालात घोंघावणाऱ्या मृत्यूशी लढवय्या शौर्याने झुंज देत त्यांनी कादंबरी लिहून पूर्ण केली. नंतर नेहमीच्याच उमदेपणाने त्यांनी मृत्यू स्वीकारला असेल याबद्दल मला खात्री आहे.

आज मुरली खैरनार नाहीत. त्यांच्यात सदैव जाणवत आलेली प्रखर ऊर्जा विलुप्त झाली आहे. त्यांचे असे अकस्मात जाणे ही व्यक्तिश: माझ्यासारख्या अनेकांसाठी खूप मोठी हानी आहे. त्याही पलीकडे, प्रखर बुद्धिमत्ता आणि असामान्य कल्पनाशक्ती असलेल्या या लेखकाचे असे अचानक आणि अकाली जाणे ही मराठी साहित्याचेच नव्हे तर एकूणच सांस्कृतिक अवकाशाचे अतोनात नुकसान करणारी घटना आहे.

अज्ञातातला एक 'शोध' प्रकाशात आला आहे आणि एक प्रखर तेजस्वी शोधप्रवास कायमचा थांबला आहे.

◆

**बालाजी सुतार**
चलभाष : ९३२५०४७८८३
majhegaane@gmail.com

## भावपूर्ण श्रद्धांजली



**लक्ष्मण लोंढे**
ज्येष्ठ विज्ञान लेखक



**कृष्णा लक्ष्मण मानकर उर्फ मानकरकाका**
टॉनिक या बाल-कुमारांच्या दिवाळी अंकाचे संपादक



**मीना वांगीकर**
ज्येष्ठ अनुवादक



**मुरली खैरनार**
प्रसिद्ध लेखक-नाट्यदिग्दर्शक








म्यवादाची तात्त्विक उपपत्ती आधी तयार झाली आणि मग साम्यवाद राववला गेला. स्त्रीवादाला मात्र एकच एक अशी तयार उपपत्ती नाही. गेल्या दोन-अडीचशे वर्षांत अनेक वैचारिक पुस्तकांतून स्त्रियांच्या स्थितीबद्दल, मानसिक जडणघडणीबद्दल विचारसरणी विकसित होत गेली. अनुभवाचे भान येऊ लागल्यावर स्त्रीला स्वतःला 'स्व' सापडत जातो व स्वतःच्या सुप्त क्षमतांची जाणीव होते. त्यानंतर तिची स्त्रीवादाकडे-स्त्रीमुक्तीकडे वाटचाल सुरू होते. एकदा या स्थितीला पोचल्यावर निर्भर, निरामय जगण्यातला आनंद स्त्री अनुभवू शकते.

स्त्रीवादाची व्याख्या करता येणार नाही, तरी या विचारातील काही ठळक मुद्द्यांची नोंद करता येईल.

**१) पुरुषप्रधानता :** समाजातील राजकीय व आर्थिक रचना पुरुष-पुरुष संबंधांतून निश्चित होते. जगातील सर्व ऐतिहासिक समाजरचनाही पुरुषशाही स्वरूपाच्या आहेत. सत्तेकडे जाणारी प्रत्येक वाट पुरुषांच्या ताब्यात असते. लैंगिक श्रमविभागणीतही स्त्रियांच्या कामाला कनिष्ठ दर्जा मिळतो. स्त्रियांच्या श्रमशक्तीवर व लैंगिकतेवर पुरुषांचे नियंत्रण असते. पुरुषशाही ही सर्व उतरंडीच्या व्यवस्थेचे मुळातील प्रारूप आहे. स्त्रीवादाला ही उतरंडीची व्यवस्था मान्य नाही. स्त्रीवाद सर्व क्षेत्रांतील पुरुषप्रधानतेचा बीमोड करतो.

**२) क्षेत्रविभागणी :** घर हे स्त्रीचे क्षेत्र आहे आणि बाहेरचे जग हे पुरुषाचे क्षेत्र आहे, अशी पूर्वापार विभागणी झाली आहे. त्यानुसार स्वयंपाकपाणी, घरकाम, पुनरुत्पादन, रीतिरिवाजांचे पालन ही कामे कायमची स्त्रियांकडे आली आणि अर्थार्जन, संरक्षण, राजकारण, सत्ताकारण वगैरे बाह्यजग पुरुषाला खुले झाले. खासगी संपत्तीच्या उदयामुळे स्त्रिया खासगी मालमत्ता झाल्या आणि पुरुष त्यांच्यावर वर्चस्व गाजवू लागले. युद्धखोरीमुळे स्त्रिया या पुरुषांच्या अस्मितेचे साधन बनल्या. पुनरुत्पादनाचे काम पायाभूत असूनही स्त्रियांना दुय्यमत्व आले. स्त्रीला झालेले मूल आपलेच आहे की नाही, या संशयापोटी स्त्रियांच्या हालचालींवर नियंत्रण आले आणि त्यांना घर नामक तुरुंगात डांबण्यात आले. घरकामाला कधीही प्रतिष्ठा मिळाली नाही. स्त्रियांची कृषिविषयक कामे विनावेतन व अदृश्य राहिली. खासगी व सार्वजनिक ही फारकत स्त्रीवादाला अमान्य आहे. सार्वजनिक क्षेत्रात जी जी कामे पुरुष करतात ती सर्व स्त्रिया करू शकतात (आता तर लष्करातही अधिकाराच्या जागेवर स्त्रिया आहेत); मात्र घरकामात पुरुषांचा सहभाग मिळत नाही. बालसंगोपनाचे कार्य फक्त स्त्रीचे नाही, पुरुषाचाही सहभाग त्यात असला पाहिजे.

**३) लिंग आणि लिंगभाव :** यात गफलत करणे पुरुषांना फायदेशीर असते. स्त्री असणे वा पुरुष असणे, हा निसर्गदत्त भाग आहे; पण स्त्री-पुरुष विषमता ही संस्कृतीत घडवली जाते. जन्माने स्त्री असलेली प्रत्येक बाई 'बायकी' असतेच असे नाही. मुलगा व मुलगी यांच्यातील भेद त्यांना जसे वाढवले जाते त्यातून जन्माला येतात. मुलगी नाजूक, सुंदर असावी; मुलगा मात्र वाळसेदार, सशक्त हवा, इथूनच अपेक्षेतील भेदांना सुरुवात होते. मुलीला घरकामाकडे वळवले जाते. मुलाला बाहेरचे जग, खेळ, स्पर्धा घडवत गेल्या आणि स्वतःच्या क्षमतांचा साक्षात्कार झाल्यावर त्या कालौघात अपरिहार्यपणे स्त्रीवादी बनत गेल्या. स्त्रीवादावर नेहमी एक आक्षेप घेतला जातो, की जो अनुभवजन्य (Empericist) आहे, तात्त्विक (Paradigm based) नाही; त्यामुळे त्याच्या शोधाची दिशा स्पष्ट नाही. अनुभूतीतूनच तात्त्विकता जन्माला येते. वैयक्तिक अनुभवाचे हे सामर्थ्य आहे, की त्यातून सामाजिक संदर्भाची शक्यता जन्माला येते. स्त्रीवादाच्या संकल्पना या काळानुरूप विकसित होत जातात. सुरुवातीच्या काळात पुरुष हेच स्वातंत्र्याचे एकमेव प्रारूप स्त्रियांपुढे होते, म्हणून स्त्रिया पुरुषांचे अनुकरण करत होत्या.

■■

**१९७५ नंतरच्या काळातील स्त्रीवादी साहित्याचा व्यापक कालपट उलगडणारा 'भारतीय भाषातील स्त्रीवादी साहित्य' हा ग्रंथ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने ८९व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनात प्रकाशित होत आहे. स्त्रीवादाच्या ज्येष्ठ अभ्यासक डॉ. अश्विनी धोंगडे यांनी या ग्रंथाचे संपादन केले आहे. या ग्रंथाला डॉ. धोंगडे यांनी स्त्रीवादाची व्यापक पार्श्वभूमी मांडणारी दीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेतील हा संपादित भाग इथे प्रसिद्ध करीत आहोत.**



अनुक्रमणिका




त्यानंतर स्त्री-पुरुषांमध्ये समता आहे पण ते एकमेकांपासून भिन्न आहेत, अशी विचारसरणी प्रभावी झाली. जे जे वैयक्तिक पातळीवर आहे ते ते समाजातील राजकारणाचा भाग (Private is Political) आहे, हा पुढचा टप्पा होता. स्त्रीमुक्ती ही मानवमुक्तीचाच एक भाग आहे, हा नंतरच्या काळाचा नारा होता; तर जगातील सर्व स्त्रियांची एकजूट, भगिनीभाव हा पुढचा विकास होता. अशा तऱ्हेने स्त्रीवाद ही प्रवाही कल्पना आहे आणि काळानुरूप त्याला नवनवे आयाम लाभत जातील, हे त्याचे सामर्थ्य आहे.

स्त्रियांची जी वैयक्तिक विफलता समजून घुसमट होत होती ती वस्तुतः पितृप्रधानतेमुळे आली आहे. पुरुषही त्याचे बळी आहेत. कारण त्यामुळे स्त्री-पुरुष दोघांचा विकास होत नाही, दोघांचे जीवन विपारी होते. म्हणून कृतीवर आधारित संशोधन हे स्त्रीवादाचे ध्येय आहे. त्यासाठी लिंगभाव संवेदनशीलता (Gender Sensitization) आणणे, ही कृती आहे. बीजरूपाने स्त्रीत पुरुषगुण व पुरुषात स्त्रीगुण असतात. त्यांचा परस्परांमधील सुसंवाद घडविण्यासाठी विकास करणे, हेदेखील स्त्रीवादाचे एक ध्येय आहे. म्हणून स्त्रीवाद फक्त साहित्यापुरता मर्यादित नाही. जुने ग्रंथ, महाकाव्ये, पुराणे, रीतिरिवाज, लोककला आणि साहित्य, इतिहास, मिथके, भूगोल, अर्थशास्त्र यांच्या नव्या मूल्यांकनाची स्त्रीवादाला जरुरी वाटते. विज्ञान, मानववंशशास्त्र, मनोविज्ञान यांच्या नव्या शोधांनी स्त्रीवादाला बळ मिळते. जगण्याच्या कुठल्याही क्षेत्रात- सिनेमा, नाटक, ललितकला, तंत्रविज्ञान, राजकारण, समाजकारण, जीवनशैली, नीतिमत्ता यामध्ये स्त्रीवादी संकल्पना राबवणे स्त्रीवादाला गरजेचे वाटते.

स्त्रीवाद ही एक विचारधारणा आहे आणि ती सुसंगतपणे सर्व आयुष्य जगताना राबवावी लागते. कधी तरी परावलंबी, पुरुषशरण भूमिका आणि कधी तरी स्त्रीवादी कणखरपणा स्त्रीवादाला मानवत नाही. स्त्रीवादी विचारसरणी अनुसरली की ती आपल्या जगण्याचा व जीवनदृष्टीचाच एक भाग बनून जाते. स्त्रीवादी विचारसरणी आपलीशी करणे ही स्त्रियांसाठी सोपी गोष्ट नाही. अनेक संघर्षांतून वाट काढत जिथे समाज, कुटुंब, सहचर- एवढेच नव्हे, तर आपणच आपले शत्रू असतो तिथे स्त्रीला यांच्याकडे वळवले जाते. मुलगी आईप्रमाणे भित्री, लाजाळू, कमजोर, मागे राहणारी, सोशिक, पडखाऊ, भावनाप्रधान, हळवी, रडवी असणे हे स्त्रीसुलभ आहे, अशी तिची वृत्ती बनवली जाते आणि हेच वागणे आपल्या लिंगाशी सुसंगत आहे असे तिला वाटू लागते. सत्ता, सामर्थ्य, प्रतिष्ठा, स्वातंत्र्य, निर्भयपणा, लढाऊपणा जेणेकरून वाढीला लागेल अशा कृतींची मुलांकडून अपेक्षा केली जाते. स्त्रीवादाने गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत हे भेद मिटवून मुलींच्या अंगात मुलांचे समजले जाणारे गुण वाढीस लावण्याचा प्रयत्न केला आहे, पण मुलींचे म्हणून समजले जाणारे गुण मुलांमध्ये बाणवण्याची प्रवृत्ती अजून दिसत नाही.

**४) स्त्री-पुरुष समता :** स्त्री व पुरुष यात कोणीच वरचढ वा कनिष्ठ नाही. समाजधारणेसाठी दोघांच्या योगदानाची गरज आहे. स्त्रियांना पुरुषांप्रमाणे स्वतःचे स्वायत्त हक्क घडविण्याचा अधिकार आहे. या हक्कांवर कोणत्याही प्रकारचे आक्रमण होऊ नये याबद्दल स्त्रीने सजग असायला हवे.

# स्त्रीवाद आणि स्त्रीवादी साहित्य



त्याचप्रमाणे हजारो वर्षे श्रेष्ठत्व गाजवण्याची पुरुषी मानसिकता बदलण्याचा प्रयत्न करायला हवा. देशाची एक जबाबदार नागरिक म्हणून तिलाही सन्मानाने वागवले जायला हवे. स्त्री ही स्त्री आहे, म्हणून कोणत्याही सहानुभूतीची तिला मदत नको; मात्र, पुरुषांच्या जगात तिला समान संधी मिळायला हव्यात आणि प्रगतीची सर्व क्षेत्रे तिच्यासाठी खुली असायला हवीत.

स्त्रीवादी विचारसणीने स्त्री-पुरुष विषमतेचा प्रश्न धसास लावला, स्त्रियांवरील अत्याचारांचे भीषण वास्तव उघडे केले, स्त्रियांच्या सत्ताहीनतेचा प्रश्न प्रकाशात आणला. विवाहांतर्गत विषमता, कौटुंबिक-सामाजिक हिंसाचार, बलात्कार इत्यादी अनेक प्रश्नांवर स्त्रियांच्या बाजूने कायदे करण्यासाठी दबाव आणला. स्त्रीला स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव करून दिली आणि तिच्या कर्तृत्वासाठी अवकाश निर्माण केला.

स्त्रीमुक्ती चळवळीच्या अनेक अंगोपांगातील एक व्यवस्थेविरुद्धचाच एक डावपेच आहे. 'जाणीवजागृती' हा स्त्री चळवळींचा मुख्य आधार असल्याने अशा खास अनुभवांना स्त्रीवादी समजले जाऊ लागले.

समाजमान्य 'बायकी'पणाच्या चौकटीत स्त्रीवादी साहित्य स्वतःला बांधून घेत नाही. स्त्रीवादी लेखिका समाजातील स्त्रीच्या स्थानाचा शोध घेतात. पुरुषप्रधानतेच्या समाजातील जागा व स्तर शोधतात. या व्यवस्थेमध्ये स्त्रियांचे होणारे शोषण व छळवणूक यांचे चित्रण करतात. संस्कृतीमधील दुटप्पी नीती, ढोंग, स्त्रियांना मिळणारी दुजाभावाची वागणूक या विरोधात संघर्षाचा व बंडाचा झेंडा उभारतात. स्त्री-पुरुष समतेवर आधारलेले नवे विश्व त्यांना अभिप्रेत असते.

स्त्रीवादी विचारसरणीला एक राजकीय अंग असते. स्त्रियांना दुय्यमत्व देण्यामागे व मुख्य प्रवाहातून बाजूला सारण्यामागे जे पुरुषी राजकारण असते त्याचा वीमोड स्त्रीवादी



**समाजमान्य 'बायकी'पणाच्या चौकटीत स्त्रीवादी साहित्य स्वतःला बांधून घेत नाही. स्त्रीवादी लेखिका समाजातील स्त्रीच्या स्थानाचा शोध घेतात. पुरुषप्रधानतेच्या समाजातील जागा व स्तर शोधतात. या व्यवस्थेमध्ये स्त्रियांचे होणारे शोषण व छळवणूक यांचे चित्रण करतात. संस्कृतीमधील दुटप्पी नीती, ढोंग, स्त्रियांना मिळणारी दुजाभावाची वागणूक या विरोधात संघर्षाचा व बंडाचा झेंडा उभारतात. स्त्री-पुरुष समतेवर आधारलेले नवे विश्व त्यांना अभिप्रेत असते.**

महत्वाचे साहित्यिक अंग म्हणून स्त्रीवादी साहित्य विकसित झाले.

स्त्रीवादी साहित्य समजून घेताना काही शब्दांचे अनेक अर्थ स्पष्ट असायला हवेत. स्त्री (फीमेल), स्त्रीप्राधान्य (फेमिनिझम) व स्त्रीवादी (फेमिनिस्ट) या अर्थांनुसार स्त्री ही स्त्री आहे म्हणून ती स्त्रीवादी असतेच असे नाही. स्त्रियांनी लिहिलेली म्हणून स्त्रियांची पुस्तके स्त्रीवादी ठरत नाहीत. स्त्रियांनी स्त्रियांवर लिहिलेली पुस्तकेही पुरुषप्रधानतेला आव्हान देणारी असतातच असे नाही. उलट, पुरुषप्रधान संस्कृतीने निर्माण केलेल्या भाषिक व वाङ्मयीन ढाच्यातच बऱ्याच स्त्रिया लेखन करताना दिसतात. त्यामुळे स्त्रीसाहित्याची वाङ्मयीन परंपरा स्त्रीवादी म्हणता येणार नाही. स्त्रीकेंद्री साहित्याचा स्त्रीप्रधानतेशी संबंध असतोच असे नाही. स्त्रीचा म्हणून 'खास' अनुभव व्यक्त करणे, ही स्त्रीवादाकडे जाणारी पहिली पायरी आहे. पितृप्रधान संस्कृतीने स्त्रियांच्या अनुभवांना अनेकदा दडपून टाकले आहे, म्हणून स्त्रियांनी साहित्यातून आपले अनुभव व्यक्त करणे हा पितप्रधान साहित्य करते. पुरुषकेंद्री विचारव्यूहातून मुक्त अशा स्त्री परिदृष्टीतून स्त्रीवादी साहित्याची निर्मिती होते. स्त्रीवादी लिखाणाची एक तुटक का होईना पण परंपरा आहे. आणि आपण त्याचे वारसदार आहोत, ही भावना ही लेखिकांची गरज आहे. पूर्वीच्या काळी स्त्रिया फार संकोचाने व संयमाने आपले लिखाण करीत. आविष्कारातील व विचारातील मुक्तता हे स्त्रीवादी लिखाणाचे वैशिष्ट्य आहे. स्त्री-पुरुष संबंधात अतिशय वरवरच्या गोष्टींबद्दलचे संदर्भ येत व कित्येकदा पुरुषांचे खरे रूप स्त्रिया लिखाणात झाकून ठेवत, पण आज मात्र स्त्रिया मोकळेपणाने स्वतःला व पुरुषांनाही लिखाणात उघड करताना दिसतात. हा विकास ठोकळेबाज आविष्काराकडून सूक्ष्म अर्थच्छटा दाखवणाऱ्या स्वयंप्रकाशी शब्दाकडे होत गेला आहे. भाषेच्या परिपूर्ण वापरावर स्त्रियांचा अजूनही ताबा नाही. विद्यमान भाषा ही पुरुषांनी बनवलेली असून पुरुषकेंद्री निकषांवर स्त्रियांचे भाषेचे भान आधारलेले आहे. पुरुषांचे भाषिक क्षेत्र हे जीवनसंघर्षात अधिकार मिळवणे, निसर्ग-अन्य माणसे-स्त्रिया यांच्यावर वर्चस्व गाजवण्याच्या वृत्तीतून निर्माण

होते. हाच दृष्टिकोन भाषिक व्यवहारात परावर्तित होतो. अशा भाषेत स्पर्शातून जाणवणे, आनंद देणे-घेणे, मिसळून जाणे, नम्र होणे अशा वृत्तीतील द्रवरूपपणाला व मृदुपणाला वाव नसतो. 'बायकी भाषा' असा शब्दप्रयोग करताना आता निदान वाङ्मयीन प्रतिमांचे पुरुषांनी वापरलेले पारंपरिक अर्थ बदलून स्त्रियांनी केलेला शब्दांचा व प्रतिमांचा वापर असा करायला हरकत नाही. रॉबिन लॅकॉफ या भाषावैज्ञानिक स्त्रीला वाटते, की बदलत्या समाजातही स्त्रिया व पुरुष भाषेचा वेगवेगळा वापर करतात. त्यांचे शब्दसंग्रह वेगवेगळे असतात आणि त्यांच्या वाक्यरचनाही परस्परांपेक्षा वेगळ्या प्रकारच्या असतात. आपल्या अनुभवांना, अनुभव घेण्याच्या पद्धतीला अनुरूप अशा भाषेची स्त्रियांना गरज वाटते. कातडीला चिकटणाऱ्या, दाही दिशांनी धावणाऱ्या शब्दांचे श्वास शोधण्याची ही खटपट आहे. शब्द जे आपले वास लपवीत नाहीत; शब्द जे रक्त, दूध, घाण, शी यासारख्या गोष्टी बोलतात, दाखवतात, अनुभवायला लावतात, अशा भाषेची स्त्रीवादी लेखकांना तीव्रतेने गरज वाटते. भाषा ही प्रामुख्याने पुरुषांना मध्यवर्ती ठेवून जणू काही स्त्रिया अस्तित्वातच नाहीत अशा वृत्तीतून निर्माण होते. त्यामुळे अनेक शब्दांची मग स्त्रीलिंगी रूपे कृत्रिमपणे बनविली जातात. प्रस्थापित झालेले व वर्चस्व गाजविणारे ठराविक वाङ्मयीन आकारबंधही स्त्रियांना नाकारावेसे वाटतात. यापेक्षा अधिक खुले आकारबंध, खुले लेखन, बंदिस्तपणाला आव्हान देणारे विचार आणि बंदिस्त विचारांना शब्दरूप देणाऱ्या अपूर्ण भाषेला निरोप देण्याची स्त्रीवादी लेखकांना गरज वाटते.

काही अनुभव हे फक्त स्त्रियांचे असतात, काही फक्त पुरुषांचे आणि काही स्त्री-पुरुष दोघांचे असतात. पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रीचे म्हणून असलेले अनुभव झाकोळले जातात. स्त्रियांच्या अनुभवातील हा 'अज्ञात प्रदेश' उजेडात आणणे ही स्त्रीवादी लेखनाची एक दिशा आहे. व्यक्तीची विचारप्रणाली ही व्यक्तीचे स्वतःचे अनुभव व बाह्यजगातील अनुभव यातून आकार घेत जाते. स्त्रीच्या बाबतीत मात्र संस्कृतीने वास्तवापेक्षा फार वेगळी प्रतिमा तिच्यापुढे ठेवल्याने, अनुभवाच्या सुसंगतीपेक्षा अनुभवाच्या विसंगतीतूनच तिला आपली विचारप्रणाली निर्माण करावी लागते. स्त्रीची प्रतिमा जी दुबळी, चंचल, भावनाप्रधान, रडवी, हळवी म्हणून निर्माण केली गेली तो स्त्रीशक्तीचा एक मोठा स्रोत असू शकतो, अशा सकारात्मक दृष्टिकोनातून स्त्रीकडे पाहायला स्त्रीवाद शिकवतो. याचाच अर्थ स्त्रियांच्या स्वभावाकडे पुरुषी चष्म्यातून न पाहता पुरुषनिरपेक्षपणे स्त्रीवादी साहित्यिक स्त्रियांकडे पाहतात.

लिखाणाच्या पद्धतीचा लिंगाधारित डावपेचांशी जवळचा संबंध आहे. स्त्रियांनी कशा प्रकारचे साहित्य लिहिले, तर त्यांना पुरुषांनी जसे लिहायला शिकवले तसे. १९ व्या शतकातील परंपरांमुळे आणि स्त्रीच्या दुय्यम स्थानामुळे तिचा बाह्यजगाशी फार कमी संबंध आला. सर्व सामाजिक स्तरांवर पुरुषांचे वर्चस्व होते. त्यामुळे जी काही वाङ्मयनिर्मिती झाली झाली त्यात पुरुषी श्रेष्ठत्व गृहीत धरण्याकडेच स्त्रियांचा कल होता. (अपवादांची नोंद याआधीच केली आहे.) संस्कृतीने घालून दिलेल्या चौकटीच्या आशयिक व भाषिक परंपरेत स्त्रिया स्वतःला बसवीत गेल्या. स्त्रीवादी साहित्याने मात्र या दोन्ही चौकटी मोडल्या. 'स्त्री' स्वतःला शोधीत गेल्याने तिला लिखाणातील आपला अवकाश सापडत गेला आणि समाजाची बंधने न मानता स्वतःच्या नजरेतून तिला जसे जग दिसते तशी लेखनात मांडणी करण्याचे धारिष्ट्य तिच्याकडे आले. म्हणूनच स्त्रीने लिहिणे आणि स्त्री म्हणून काही साहित्य लिहिणे हा फरक स्त्रीवादात करावा लागतो. स्त्री ही आपल्या शारीरानुभावासकट स्वतःला साहित्यातून व्यक्त करत असते, म्हणून पुरुषांनी स्त्रीच्या भूमिकेतून (रोल प्ले) साहित्य लिहिले तरी ते स्त्रीवादी ठरत नाही कारण त्यांचे पुरुषत्व व पितृसत्ताकत्व त्यांच्या बरोबर असते.

स्त्रीवादी साहित्य हे घर, कुटुंब, नातेसंबंध, स्त्रीचे समाजातील स्थान यातच अडकून पडले आहे, असा एक आक्षेप नेहमी घेतला जातो. युद्ध, राजकारण, समाजातील उलथापालथी, राजेरजवाड्यांची कटकारस्थाने, जातिधर्मांतले संघर्ष, यावरचेच साहित्य श्रेष्ठ असे मानण्यामागे एक पुरुषी धारणा आहे. संस्कृतीच्या जडणघडणीत स्त्रियांना पूर्वापार समान वाटा दिला असता तर ते चित्र बदलले असते. कदाचित दोन्ही महायुद्धे यामुळे टळली असती, असेही व्हर्जिनिया वुल्फला वाटते. शोषण, हिंसा आणि युद्ध यांच्या जोरावर पुरुषांनी सांस्कृतिक वारशावर आपले प्रभुत्व गाजवले. हा मोठ्या प्रमाणावर सामाजिक अन्याय आहे व तो आज्ञार्थी वापरला गेला. पुरुषांच्या हाती सत्ता आहे म्हणून पुरुषांचा दृष्टिकोन जागतिक समजला गेला. ज्यांच्याकडे सत्ता नाही, ज्यांच्यावर फक्त सत्ताच गाजवली गेली, त्यांचेही विचार जगाच्या पूर्ण आकलनासाठी आवश्यक आहेत. पुरुषांना आपल्या स्थानामुळे जे समजू शकत नाही, स्वतःबद्दल जे समजू शकत नाही ते स्त्रीला त्याच्याविषयी कळू शकते. म्हणून स्त्रियांचे दृष्टिकोन, त्यांचे लिखाण हेही तितकेच महत्त्वाचे आहे. त्यामुळे स्त्रियांनी राजकीय पवित्रा घेऊन या हुकूमशाहीला आपल्या लेखनातून आव्हान दिले.

◆

डॉ. अश्विनी धोंगडे
चलभाष : ९९७५६१३१३८
ashwinid2012@gmail.com



## मालिका
# समकालीन कवी

**मराठी कवितेच्या प्रवाहात आज अनेक समकालीन कवी-कवयित्री आपल्या अनुभूतीची ओंजळ रिती करून हा प्रवाह अधिक खोल व व्याप्त करत आहेत. जीवनाच्या व्यामिश्रतेला सामोरे जात जगण्याच्या मुळांना, पर्यायाने व्यापक मानवी जाणिवांना भिडण्याचा प्रयत्न ते करताना दिसत आहेत. अशा काही आश्वासक समकालीन कवी-कवयित्रींनी स्वत:च्याच कवितेवर केलेले भाष्य व जाणकारांनी त्यांच्या कवितेचा घेतलेला परामर्श या मालिकेतून मांडत आहोत. या अंकात कवी अजय कांडर.**

हे बघ, कविता लिहिणे, पेपरमध्ये काम करणे हे भिकारपणाचे लक्षण आहे. आमच्या घरात असे कोणी काही आतापर्यंत केले नाही. हे उंडग्यांचे काम ...तुला शेती करायची आहे की मुंबईला येऊन नोकरी करायची आहे याचा तूच काय तो निर्णय घे. कष्टाने पैसे मिळविणे सोपे नाही. वर्षाला तू एक हजार रुपये मिळवून दाखव.''

कविता लिहितो आणि गावाकडून वृत्तपत्राकडे वातम्या पाठवितो, म्हणून घरातून माझ्या काकांनी अशा शव्दांत चक्क मला दम भरला होता. शेवटी मी त्यांचे काहीही ऐकले नाही. त्यामुळे ते मला मुंबईला आपल्या प्रिंटिंग प्रेसमध्ये कामासाठी घेऊन गेले. हा काळ होता १९९० च्या दरम्यानचा. पण माझी कवितेवरची निष्ठा अशी, की तिथेही मी कवितेच्याच शोधात मुंबईभर भटकत राहिलो. माझ्यावर घरातून, गावातून वारकरी परंपरेचे संस्कार झालेले. आमच्या गावी नव्हतेच. पण भजनामुळे संतांचे अभंग आणि रेडिओमुळे गीतरचना स्वरूपातील कविता कानावर सतत पडल्याने कवितालेखनाचा प्रारंभ हा छंदोवद्ध काव्यलेखनातूनच झाला. मुंबईला आल्यावर एका कार्यक्रमात कवी रमेश तेंडुलकरांची भेट झाली. त्यांना भीत भीत माझी कवितेची वही दाखविली. तेंडुलकर सरांनी कविता वाचल्या नि ते क्षणभर माझ्याकडे बघत राहिले. म्हणाले, ''तू गावाहून आलास...'' मी 'हो' म्हणालो. ''गाव कुठे?'' ''सिंधुदुर्ग-कणकवली.'' ''हो का?..सावंतवाडीच्या कवी वसंत सावंत यांना ओळखतोस का?'' मी आठवल्यासारखं करत म्हणालो, ''नाव ऐकले आहे सर, पण भेट नाही झाली.'' ''तू चांगली कविता लिहिशील. पण नव्या कवींच्या कविता वाच. नारायण सुर्वे, द. भा. धामणस्कर, नारायण कुळकर्णी-कवठेकर यांच्याजवळ जाणारी तुझी कविता आहे. हे



अजय कांडर हे महत्त्वाचे समकालीन कवी असून त्यांचे 'आवानओल' आणि 'हत्ती इलो' हे दोन कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.




घरात, गावात वाचनाची आवड कोणाला नव्हतीच. वृत्तपत्र वाचायचे असेल तर ते मिळविण्यासाठी सहा किमी जावे लागे. त्यामुळे घरात आणि गावातही साहित्यलेखनाचे वातावरण नव्हते. परिणामी, गावातील भजनमेळ्यातील कानावर पडलेले अभंग आणि रेडिओवरची 'आपली आवड' हीच आमची कवितेच्या व्यासंगाची शिदोरी. अर्थात त्यामुळे कवितेची परंपरा ही काय भानगड असते हे कवी वाचलेस का?'' मी 'नाही' म्हणालो. पण तेंडुलकर सरांच्या या उद्‌गाराने मी भारावून गेलो. दुसऱ्या दिवशी ठाण्याला गेलो. या तीनही कवींचे काव्यसंग्रह मिळविले. सुर्व्यांचा 'माझे विद्यापीठ', धामणस्करांचा 'प्राक्तनाचे संदर्भ' आणि कवठेकरांचा 'हे माझ्या गवताच्या पात्या' हे तीनही संग्रह वाचले आणि प्रथमच कविता कशी असावी याची जाणीव झाली. या तिघांच्याही कवितेने मी एवढा दडपणाखाली

आलो, की आपण आता कविता लिहू नये असेच वाटू लागले. पण ज्या कवितेच्या शोधात मी होतो ती तर हीच कविता, असेही लक्षात आले.

याच दरम्यान मुंबईत इतिहास संशोधक मनोहर कदम यांची भेट झाली. त्यांच्याबरोबरच्या सततच्या चर्चेतून मराठी कवितेची परंपरा नीटशी समजून घेता आली. मर्ढेकरांनंतरची साठोत्तरी कविता कळली. सत्यकथा आणि त्यानंतरची लघुनियतकालिकांची परंपरा कळली. याच काळात मराठी कवितेचे मोठ्या प्रमाणात वाचनही झाले. यातून कविता लिहिण्याचे सजग भान येत गेले. याच दरम्यान मुंबईतील बॉम्बस्फोट आणि जातीय दंगल जवळून अनुभवली. दंगलीत तर मुंबई-करीरोड, ना. म. जोशी मार्ग, वरळी या भागात थेट घुसून ते पाहत होतो. काही मोहल्ल्यांत डोळ्यांदेखत हत्याचे नव्हते होत होते. या साऱ्या प्रकाराने मी हादरून गेलो. शेवटी मुंबईच्या जीवनाला कंटाळून पुन्हा गावी आलो. वृत्तपत्रात पुन्हा काम करू लागलो. या सगळ्यातून कवितेकडे बघण्याचा माझा दृष्टिकोनच बदलून गेला आणि 'आवानओल'मधील कविता लिहिण्याची वाटचाल सुरू झाली.

सुर्व्यांची कविता वाचताना प्रथमच लक्षात आले, की जगणे आणि लिहिणे यात अंतर नसते. त्यांची कविता श्रमांशी होतेच; पण त्यातून मीच मला मोकळे करून घेण्याचा तो प्रकार होता. यातही मी ज्या वावशी (ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग) या माझ्या गावी राहत होतो, तो गाव विकासापासूनच नव्हे, तर अगदी प्राथमिक सुविधांपासूनही वंचित राहिलेला. गावात त्या वेळी एसटीचीही सुविधा नव्हती. आजही चौथीपर्यंतच शाळा आहे. पुढील शिक्षणासाठी सात किमी एवढे दूर जावे लागते. गाव अगदी लहान, म्हणजे गावात चाळीस घरांचा उंबरा. चारशे लोकवस्ती. शेती हेच काय ती रोजगाराचे साधन. गावात तीव्र पाणीटंचाई. पिण्याच्या पाण्यासाठीही गावभर भटकावे लागे. उन्हाळ्याच्या दिवसांत तर पाणी समस्या अधिकच तीव्र होत जायची. चाळीस घरांच्या गावात चौदा विहिरी, पण त्यांचा तळ कोरडाच. गावातील एका डुंगलीच्या तळाशी एक झरा ओलावलेला असायचा. तिथेच साऱ्यांचा प्राण मग तहानलेला. रात्री-अपरात्री तिथे बायांची रांग वाढत जायची. याचेच वर्णन माझ्या वहुचर्चित 'बाया पाण्याशीच बोलतात' या कवितेत आले आहे-

*'एक घागर भरत नाही, दुसरी रिकामीच,*
*तरी रांगाच रांगा जातात वाढत*
*बाया झऱ्यापाशीच उभ्या,*

# कोसळतो आहे आपल्यावर राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक अधःपतनाचा काळ! - अजय कांडर

निगडित होती. मी गावाकडला माणूस. शेतात काम करणारा, गुरे राखता राखता कविता लिहिणारा- शेतात काम करताना विशेषतः शेतात राबणाऱ्या शेतकरी बायांची कविता याच काळात माझ्याकडून लिहिली जात होती. सर्वदूर पसरलेल्या खेड्यांतील बायांच्या दुःखाची वेदना तशी सारखीच. या बायांना कधी घोटभर पाण्यासाठी वणवण भटकावे लागते, तर कधी अनेक कष्टांतून बायांच्या डोळ्यांत नेहमीच पाणी वाहत राहते. अर्थात या सगळ्याचा मी जन्मापासूनच साक्षीदार असल्याने ग्रामीण भागातील कष्टकरी बायांच्या दुःखाची वेदना तपशीलवार माझ्या कवितेत सघन होत जाणे अपरिहार्य

*आटत चाललेल्या धान्यासारख्या तुटक बोलत*
*किती वाढत जातो उन्हाळा,*
*झऱ्यावरच पहारा ठेवताना*
*दिवस-रात्री बाया पाण्याशीच बोलतात,*
*झरा मुका होत जाताना'*

वेगवेगळ्या अर्थाने हाच बायांचा दुखरा स्वर मग माझ्या त्या वेळच्या सर्व कवितांमध्ये आला. तळकोकणातील प्रत्येक घरातील एखादा पुरुषच गावी शेतीसाठी राहतो. शेतीत राबतो. कुटुंबातील बाकी सगळे पुरुष नोकरीसाठी मुंबईला. मात्र, त्यांच्या बायका वर्षानुवर्षे त्यांची वाट पाहत गावीच असतात.

सर्वचदृष्ट्या उपेक्षित राहिलेल्या. त्यांची मानसिक, शारीरिक उपेक्षा समजून घेणे कठीणच. पण या सगळ्याचा वेध या कवितांमधून मला घेणे ही माझी त्या वेळी कवितेतून मोकळे होण्याची गरज वाटत गेली. या सर्व कविता पुढे २००५ मध्ये शब्दालय प्रकाशनातर्फे प्रकाशित झालेल्या 'आवानओल' या माझ्या पहिल्या काव्यसंग्रहात संकलित झाल्या आहेत. फक्त 'आवानओल' या शीर्षक कवितेतच नव्हे, तर या संग्रहातील अन्य कवितांमध्येसुद्धा दैनंदिन व्यवहारात बोलत असलेल्या बोलीचा चपखलपणे वापर झालेला दिसेल. खरे तर आपण बोलीभाषा बोलतो म्हणूनच त्यातले शब्द प्रमाण मराठी भाषेला जोडून कवितेत येतात असे नाही, तर त्या बोलीशी आपली मानसिकता निगडित असते, आपली संस्कृती निगडित असते. आपण राहतो त्याभोवतालचे लोकजीवन एकरूप झालेले असते आणि या सगळ्यातून आपण आपल्या नकळत बोलीतील शब्द आपल्या भाषिक कलाकृतीत उतरवीत असतो. हे असे होणे ही चांगलीच गोष्ट आहे. कलेच्या दृष्टीने आणि भाषेच्या दृष्टीनेही. कारण कोणतीही प्रमाणभाषा तिच्या बोलीतून समृद्ध होते, पुढे जाते, टिकून राहते आणि आपल्या जन्मापासून आपण बोलीतूनच विचार करीत असल्याने आपली बौद्धिक वाढही बोलीच्या संवादातून होत असते. आमच्या 'बावशी' या गावात कमी ओल असलेल्या ज्या भागात रोपाची लावणी केली जाते त्या जागेला 'आवानओल' म्हणतात. अशा कमी ओलीच्या भागात लावलेले रोप जगतही नाही आणि मरतही नाही. अशा स्थितीत ते उगवून येते. खेड्यातील कष्टकरी बायांचे जगणेही 'आवानओल' रोपासारखे आहे. म्हणून या संग्रहाला 'आवानओल' हे शीर्षक दिले. आदरणीय भालचंद्र नेमाडे यांनी 'आवानओल'चा अर्थ मला विचारून घेऊन त्या वेळी हे शीर्षक काव्यसंग्रहाला किती समर्पक आहे हे सांगितले होते.

माझा कवितासंग्रह येण्यापूर्वी माझ्या कविता सुमारे पंधरा वर्षे सातत्याने बहुसंख्य प्रमुख वाङ्मयीन नियतकालिकांतून प्रसिद्ध होत होत्या. तरीही 'आवानओल'मधील कविता जाणकार वाचक कशी स्वीकारेल याबाबत मी साशंक होतो; पण या कवितेचे चांगले स्वागत झाले. त्या वेळी 'आवानओल' काव्यसंग्रहाला महाराष्ट्र फाउंडेशनसह त्या वर्षीचे बहुसंख्य महत्त्वाचे काव्यपुरस्कार तर मिळालेच; पण आदरणीय चंद्रकांत पाटील यांनी यातील काही कविता वेगवेगळ्या अनुवादकांकडून हिंदीत अनुवादित करून घेतल्या आणि त्यांचा हिंदीतील वेगवेगळ्या ग्रंथांमध्ये समावेश केला. विशेषतः त्या वेळी पाटील सरांसारख्या जागतिक आणि भारतीय साहित्याचा अभ्यास असणाऱ्या अभ्यासकाने माझ्या कविता स्वीकारल्या याचा आनंद खूप झाला. पुढे 'आवानओल'मधील कवितांचे उर्दू, मल्याळम, इंग्रजी आदी भाषांमध्ये अनुवाद झाले. काही कवितांचा विद्यापीठ आणि शालेय अभ्यासक्रमात समावेश झाला. या निमित्ताने साहित्य अकादमीची प्रवास फेलोशिप प्राप्त झाली, तर अनेक मान्यवरांनी 'आवानओल'मधील कवितांवर समीक्षालेखन केले. आता त्याचा 'ओल अनमोल आवानओल' हा प्रा. डॉ. शरयू आसोलकर संपादित समीक्षाग्रंथ प्रकाशनाच्या वाटेवर आहे, तर 'आवानओल' संग्रहाची दुसरी आवृत्तीही प्रसिद्ध झाली आहे.

'आवानओल'मधील सर्वच कविता लिहिताना जी मानसिक जडणघडण झाली होती ती माझ्या गावाकडच्या अनुभवविश्वापुरतीच सीमित होती. त्यानंतर माझी कविता सर्वार्थाने बदलली. माझ्या व्यक्तिमत्त्वातील बदल; वाढत्या शारीरिक-मानसिक वयामुळे, वेगवेगळ्या बऱ्या-वाईट अनुभवांमुळे, कौटुंबिक जबाबदाऱ्यांमुळे, काळाच्या ओघात जाणिवा विस्तारल्यामुळे आणि विशेषतः माझ्या वाढत्या आजारपणामुळे माझा जगण्याकडेच बघण्याचा दृष्टिकोन बदलत गेला. मी व्यक्तीकडून समष्टीकडे आधी जात होतोच; पण आता मात्र मला समष्टीचाच विचार अधिक करावासा वाटतो. या बदललेल्या जाणिवेमुळे मी जगातल्या शोषित घटकांचा अधिक तीव्रतेने विचार करू लागलो. समाजाचे प्रश्न मला माझ्या जगण्याचे प्रश्न वाटू लागले. यातून माणूस आणि कवी म्हणून सार्वत्रिक होत जाताना मला माझ्या सामाजिक जबाबदारीचेही भान येत गेले. मुख्यतः जगात आपल्यापुरते असे काही नसते, ते सार्वत्रिकच असते, हा विचार माझ्या मनात डोकावू लागला. त्यामुळे आपल्या आजूबाजूला घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर विचार करणे आणि त्याबाबतचे बरे-वाईट मत ठरविणे हे माझ्यासाठी क्रमप्राप्त होत गेले. विशेषतः याच काळात सामाजिक विचारसरणीतून मी जो जाणिवांच्या पातळीवर विचार करत होतो तो नेणिवेच्या पातळीवर करू लागलो. उदाहरणार्थ, जातीचे आणि धर्माचे प्रश्न कसे निर्माण केले जातात आणि त्यातून आपल्याला बाजूला ठेवणे हे किती गरजेचे आहे, हे लक्षात येत गेले. जात, धर्म, देव यांच्याशिवाय माणूस जगू शकतो का, ही प्रक्रिया माझ्या मनात सुरू झाली आणि या प्रक्रियेच्या प्रगल्भतेतूनच पुढे मी 'हत्ती इलो' या दीर्घ कवितेचे लेखन केले. पण गेल्या काही वर्षांत जातीचे आणि धर्माचे प्रश्न निर्माण करून माणसाला माणसासमोरच उभे केले जातेय आणि यातून माणूस माणसालाच संपवत चाललाय. यामुळे 'कोणत्याही जाती-धर्माच्या मंचावर न जाणे ही माझ्या जगण्याची आणि कविता लिहिण्याचीही भूमिका समजत आलोय.' कधी नव्हे एवढी आज सर्वकालीन सर्वधर्मसमभाव बाळगण्याची गरज निर्माण झाली आहे.

आपल्या सगळ्या जगण्याच्या मुळाशी राजकारण आहे.



अनुक्रमणिका

खरे तर जगण्याच्या प्रत्येक गोष्टीत राजकारण असतेच. स्वातंत्र्यानंतर देश प्रगतिपथावर जाण्यासाठी काही विशिष्ट राजकीय विचारसरणीने, मूल्यांनी देश घडविण्याचा प्रयत्न केला. त्या विचारसरणी, ती मूल्ये एकूण समाजासाठी लाभदायी ठरण्यासाठी अनेकांनी प्रयत्न केले. त्याच विचारसरणीतून नेतृत्वही जन्माला आले. पुढे या नेतृत्वाचा प्रभाव जनमानसावर झाला आणि समाजात एक राजकीय प्रगल्भताही निर्माण झाली. तोपर्यंत राजकारणाला काही नैतिकता आणि वैचारिक मूल्य प्राप्त झाले होते. परंतु कोणतीच राजकीय विचारधारा नसलेली माणसे राजकारणात स्थिरावू लागली आणि समाजातील एक विशिष्ट राजकीय धारा संपुष्टात आली. इथूनच राजकीय अराजकतेला प्रारंभ झाला. या अर्थाने म्हटले तर 'हत्ती इलो' हे राजकीय रूपक आहे. ही कविता या राजकीय अराजकतेच्या मुळांचा शोध घेण्याचा प्रयत्न करते. मानवी मूल्यांच्या आधारावरच राजकारण करू पाहणारी विचारधारा आपल्याकडे क्षीण होत गेली आणि याच काळात धर्मनिष्ठ आणि त्यातून व्यक्तिनिष्ठ राजकारणाला प्रारंभ झाला. त्यामुळे बेसिक मानवी मूल्यांची विचारधारा अशा राजकारणाला नसल्याने कोणतीही विचारधारा नसलेला समूह या धर्मनिष्ठ आणि व्यक्तिनिष्ठ राजकारणाच्या कळपात सहभागी होऊ लागला. असा समूह जेव्हा राजकारणात स्थिरावला तेव्हा त्यातून समाज विध्वंसाकडे जाण्याच्या घटना घडल्या. याच काळात धर्माचे स्तोम माजू लागले. जात, धर्माची घरात जपणूक केली जात होती ती खुले आम चव्हाट्यावर आली. ती सार्वजनिक होत समाजविघातक कृत्ये त्यातून घडू लागली. समाजात दुफळी निर्माण करण्याचे काम धर्मनिष्ठ राजकारणातून होऊ लागले. यात मानवी मूल्यांच्या आधारावर जो समूह जगत होता, त्याचीच मानसिकता धर्मनिष्ठ बनविण्यात धर्मनिष्ठ राजकीय नेतृत्वाने पुढाकार घेतला आणि त्यात हे नेतृत्व यशस्वी झाले. यातून प्रारंभी राजकारण आणि त्यातून एकूण समाजव्यवस्थाच अराजकतेकडे जाण्यास प्रारंभ झाला. कोणतीही विचारधारा नसलेला माणूस राजकारणात स्थिरावला आणि राजकारणाची 'मसल पावर'च्या दिशेने वाटचाल सुरू झाली. पूर्वीचे राजकारण व्यक्तीकडून समष्टीकडे जात होते ते समाजाकडून व्यक्तीकडे जायला लागले. यातून सध्याचे राजकारण व्यक्तिनिष्ठ झाले. जेव्हा जेव्हा जी गोष्ट व्यक्तिनिष्ठ होते तेव्हा तेव्हा समाज संकुचित होत असतो. संकुचित समाजातून मानवी मूल्यांना धोका पोहोचतो. आजचे राजकारण या पद्धतीने घडत असून 'हत्ती इलो' ही कविता या सर्वांकडे निर्देश करते. जिचे नेतृत्व मान्य केले गेले, त्या व्यक्तीकडे सामाजिक भान, जागरुकता नसल्याने पुढे याच व्यक्तीच्या आधिपत्याखाली एकूण समाजव्यवस्था राबविली जात असल्याने आपल्या सत्तेचा गैरवापर सतत होऊ लागला. यातून राजकारणाबरोबरच सामाजिक, राजकीय अधःपतन सुरू झाले. सत्ता हातात येताच समाजाभिमुख विकासाची प्रक्रिया सुरू ठेवण्यासाठी विशिष्ट समूहाचेच जीवनमान उंचावण्यासाठी असे राजकीय नेतृत्व प्रयत्न करीत राहते. असे होताना तळातला वर्ग तळात राहण्याची प्रक्रिया वेग घेताना आता श्रीमंत माणूस अधिक श्रीमंत आणि तळातला माणूस अधिक तळात राहत असल्याचे लक्षात येईल. अर्थात याला शोषणाचेही विविध कंगोरे आहेत. हे शोषण मानसिक, सामाजिक, आर्थिक आणि भौतिक सुखासंदर्भात होत आहे. आज विकासाच्या नावाखाली मोठमोठे प्रकल्प उभारले जात आहेत; पण हे प्रकल्प ज्यांच्या जमिनीवर उभारले जाणार आहेत त्यांना गृहीतच धरण्यात येते. ज्यांनी आपल्या जमिनीचे संचित जिवापाड जपले त्यांना याबाबत कोणतीही जाणीव करून दिली जात नाही. भूमीवर मालकी हक्क असलेल्या माणसाला भूमिहीन करण्याची प्रक्रिया आता अशी जोरात सुरू आहे. विशेष म्हणजे असे भूमिहीन करण्यासाठी जे बळ लागते, त्या बळासाठी जन्मोजन्मी भूमिहीन असलेल्या माणसांच्या बळाचा वापर केला जातो. यात एक मोठी गंमत असते. अशा वेळी एकमेकांशी लढणारे दोघेही शेवटी भूमिहीन होतात आणि कालांतराने परिस्थितीला शरण जाऊन हे दोघेही राजकीय व्यवस्थेच्या पुन्हा दावणीला बांधले जातात.



**मला वाटते, कवी-लेखकाने समाजातील अंतर्विरोध समजून घेत आपले लेखन करीत राहिले पाहिजे. हे करतानाच माणूस म्हणूनही आपल्यातला सहानुभाव वाढत राहायला पाहिजे. त्यामुळे माझ्या काव्यलेखनाच्या प्रवासातून मला कोणताही सन्मान मिळाला नाही तरी चालेल, पण माझ्यातले माणूसपण सतत पाझरत राहो, याचीच मी आस बाळगत काव्यलेखन करीत आलो आहे.**

सामाजिक अधोगती रोखायची असेल, तर समाजकार्यातील अंतर्विरोध एकमेकांनी समजून घेत, एकमेकांना आधार देत सामाजिक काम करत राहणे महत्त्वाचे असते. मात्र, सत्तेच्या अभिलाषेपोटी कोणतीही वैचारिक कुवत नसलेल्या नेतृत्वाच्या अधीन गेलेला सामाजिक








कार्यकर्ता आपले डोके त्या नेतृत्वाकडे गहाण ठेवत असल्याचेच चित्र स्पष्ट होत आहे. यातून जो तत्त्वनिष्ठ राजकारण करू पाहतोय त्याची मानसिक छळणूक करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. त्याचा अर्थ असा नाही, की मुळात राजकारण वाईट आहे, किंवा राजकारणाच्या जवळ जाणे किंवा त्यात सहभागी होणे वाईट आहे. खरे तर विचार करणाऱ्या माणसाने राजकारणात सक्रिय सहभागी होणे गरजेचे आहे. असे झाले तर राजकारणाचा स्तर नक्कीच उंचावेल. पण असे न होता ज्यांच्या हातात सत्ता आहे त्यांच्या जवळ जाण्याचा प्रयत्न सामाजिक व्यवस्था राबविणारेही करताना दिसतात. किंबहुना ते राजकीय नेतृत्वाच्या जवळ जात नाहीत, तर त्याच्या एखाद्या मुद्द्याची पाठराखण करण्याच्या मोहापायी आयुष्यभर त्या नेतृत्वाचे समर्थकच बनून जातात. जेव्हा राजकीय, सामाजिक अधःपतन होते तेव्हा सांस्कृतिक विचार अधिक प्रगल्भपणे समाजात रुजविणे गरजेचे असते. एखाद्या गोष्टीमुळे समाजाचे विघटन होऊन समाज दुभंगत जातो, तेव्हा समाज एकसंध ठेवण्याची जबाबदारी सांस्कृतिक क्षेत्रात वावरणाऱ्या जबाबदार घटकांची असते. सांस्कृतिक अभिसरण जेव्हा जेव्हा निकोप होते तेव्हा तेव्हा समाज वैचारिकदृष्ट्या प्रगल्भ होत असतो. अशा वेळी सांस्कृतिक कृती करताना माणूस विचारशील बनेल याचीही काळजी घ्यायची असते. त्यामुळे आपल्याकडून सांस्कृतिक मूल्यांची सरमिसळ होऊ नये याचीही दक्षता सांस्कृतिक क्षेत्रातील अग्रणी व्यक्तींनी घ्यायला हवी. मात्र, सांस्कृतिक क्षेत्रात वावरणारे काही धुरीण सांस्कृतिक काम करताना पुरोगामित्वाचा बुरखा पांघरत असतात आणि व्यक्तिगत आयुष्यात अत्यंत जातीयवादी, धर्मनिष्ठ जगतात. खरे तर पुरोगामी विचारवंतांनी सांस्कृतिक कृती करताना आपले व्यक्तिगत आयुष्यही पुरोगामी ठेवणे गरजेचे असते. अनेकजण सांस्कृतिक क्षेत्रात नावलौकिक मिळविणारे, जातीची आणि धर्माची प्रतीके खुले आम समाजात मिरवताना दिसतात. विचारशील समजल्या जाणाऱ्या अशा सांस्कृतिक दिग्गजांकडून अशी अविचारी कृती घडत राहते तेव्हा राजकीय अपप्रवृत्तीला अधिक बळकटी मिळत असते. त्यामुळे अशा सांस्कृतिक माणसांना राजकीय व्यवस्था आपापल्या कळपात घेऊन आपली बाजू अधिक बळकट करण्याचा प्रयत्न करीत असते. किंवहुना त्यामुळेच आपण राबवत असलेली राजकीय व्यवस्थाही पुरोगामी असल्याचा भास निर्माण करण्यात ती यशस्वी होते. मात्र, आपल्यामुळे ती राजकीय व्यवस्था समाजाची फसवणूक करीत आहे, याचेही भान सांस्कृतिक क्षेत्रातील अग्रणी राखत नाहीत. या सगळ्याचा उद्रेक 'हत्ती इलो'मध्ये प्रकट होतो.

'हत्ती इलो' काव्यसंग्रहाला वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळाला. त्याची 'माऊथ पब्लिसिटी' मोठ्या प्रमाणात झाली. अनेक प्रतिष्ठित पुरस्कार मिळाले. अनेक मान्यवरांनी त्यावर लेखन केले. त्याचा आता मुक्तशब्द प्रकाशनकडून प्रा. रणधीर शिंदे संपादित समीक्षाग्रंथ प्रकाशित होत आहे. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या एमएच्या अभ्यासक्रमात 'हत्ती इलो'चा समावेश करण्यात आला आहे. ज्येष्ठ नाटककर्मी वामन पंडित हे 'हत्ती इलो'चे अभिवचनाचे जाहीर कार्यक्रम करतात, तर साहित्य अकादमी पुरस्कारविजेते 'कोकणी' कवी माधव बोरकर हे 'हत्ती इलो' कोकणी भाषेत अनुवादित करीत असून हा अनुवाद संहित प्रकाशनतर्फे प्रकाशित होणार आहे.

आता मला वाटते, माझी पुढील लिहिण्याबाबतची भूमिका महत्त्वाची आहे. आज गाव आणि शहर वरवर पाहता एक झाल्यासारखे वाटत आहे; पण तसे नाही. गावावर शहर स्वार होत आहे आणि गावाला शहराजवळ जायची घाई झाली आहे. यातून गावातील सामान्य माणूस फक्त भरकटलाच आहे असे नाही, तर तो पार उद्ध्वस्त होत चालला आहे. याबाबतचे काही लेखन माझ्याकडून होत आहे, तर दुसऱ्या बाजूला 'हत्ती इलो'सारखे दीर्घ कवितांचे लेखन मी करीत आहे. मी दहा वर्षे आजारी होतो. माझ्या दोन्ही किडन्या फेल गेल्या. शेवटी डायलिसिसवर होतो. त्यासाठी पुण्याला सुमारे दीड वर्ष दीनानाथ रुग्णालयात उपचार घेत होतो. शेवटी माझी पत्नी अरुणाने मला आपली किडनी दिली. आता मी बरा होऊन गावी आलो आहे. मला यातून बाहेर काढण्यासाठी माझ्या कुटुंबाबरोबरच माझ्या अनेक मित्रांनी मदत केली. या संदर्भातील एक स्वतंत्र लेखनाचे पुस्तक लिहिण्याचा माझा मानस आहेच, परंतु सध्या मी यावर 'मी मृत्यूच्या शय्येवर झोपलो आहे केव्हापासून' ही एक दीर्घ कविता लिहीत आहे. तर आज देशात अनेक असहिष्णू घटना घडत आहेत. त्यामुळे विचारी माणूस प्रचंड अस्वस्थ आहे. आपण डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचाराने वाटचाल केली तर लोकशाही आपली अबाधित राहील, असा मला विश्वास वाटतो. त्यामुळेच मी सध्या आंबेडकरांवर 'युगानुयुगे तूच' या दीर्घ कवितेचे लेखन करत आहे.

मला वाटते, कवी-लेखकाने समाजातील अंतर्विरोध समजून घेत आपले लेखन करीत राहिले पाहिजे. हे करतानाच माणूस म्हणूनही आपल्यातला सहानुभाव वाढत राहायला पाहिजे. त्यामुळे माझ्या काव्यलेखनाच्या प्रवासातून मला कोणताही सन्मान मिळाला नाही तरी चालेल, पण माझ्यातले माणूसपण सतत पाझरत राहो, याचीच मी आस बाळगत काव्यलेखन करीत आलो आहे.

◆

**अजय कांडर**
चलभाष : ९४०४३९५१५५
ajay.kandar@gmail.com

प्रभा गणोरकर

# अजय कांडर
## अस्वस्थ काळाची स्थिती मांडणारा कवी



अजय कांडर यांचा 'आवानओल' हा पहिला संग्रह 'शब्दालय' प्रकाशनातर्फे २००५ साली प्रकाशित झाला. त्याची दुसरी आवृत्ती २०१४ साली प्रकाशित झाली. दरम्यान या संग्रहाला पुरस्कार प्राप्त झाले. त्यातील कवितांचे हिंदी, उर्दू, मल्याळम अशा भाषांमध्ये अनुवाद झाले. पहिल्या संग्रहाची गुणवत्ता रसिकांनी वाखाणावी ही गोष्ट कवीला प्रोत्साहन देणारी नक्कीच आहे. या संग्रहानंतर अजय कांडर आत्मानुकरणात रमले नाहीत. त्यांनी 'हत्ती इलो' ही दीर्घकविता लिहिली. ती प्रकृतीने पहिल्या संग्रहातल्या कवितेहून भिन्न वाटत असली तरी ती तशी नाही. स्वतःच्या जीवनापेक्षा इतरांच्या जगण्याकडे संवेदनशीलतेने पाहण्याचा अजय कांडर यांचा स्वभाव आहे. त्याचे प्रत्यंतर पहिल्या संग्रहातल्या कवितांतूनच येते.

अजय कांडर यांचा 'आवानओल' हा पहिला संग्रह २००५ साली प्रकाशित झाला. या संग्रहानंतर अजय कांडर आत्मानुकरणात रमले नाहीत. त्यांनी 'हत्ती इलो' ही दीर्घकविता लिहिली. ती प्रकृतीने पहिल्या संग्रहातल्या कवितेहून भिन्न वाटत असली तरी ती तशी नाही. स्वतःच्या जीवनापेक्षा इतरांच्या जगण्याकडे संवेदनशीलतेने पाहण्याचा अजय कांडर यांचा स्वभाव आहे. त्याचे प्रत्यंतर पहिल्या संग्रहातल्या कवितांतूनच येते.

'आवानओल' या संग्रहात ४५ कविता समाविष्ट आहेत. त्यातल्या सुमारे वीस कविता स्त्रीजीवनातील दुःख टिपणाऱ्या आहेत. ही स्त्री विशिष्ट प्रदेशातील आहे असे दिसत असले, तरी खेड्यातील श्रम करणारी, शेतात खपणारी, जीवनातल्या साध्या साध्या गोष्टींपासून, आनंदापासून वंचित असलेली, त्याबद्दल क्षणकाल खंतावणारी पण आहे. त्यात समाधान मानून घेणारी, कुटुंबात रमणारी ही स्त्री प्रातिनिधिकच वाटते. कृषिजीवनाशी निगडित जो परिसर आहे तो कोकणातील आहे. 'डुंगलातील झरा', 'भाताची शेती', 'मेर', 'डोंगराचा चढउतार' असे प्रादेशिक विशेष आणि कोकणी बोलीचा सहजस्फूर्त उपयोग यातून हे कोकण उभे होत जाते. कोकणातले दारिद्र्यही काही कवितांतून उमटून येते.

*'लोक घरात थगतंत टोप्ही*
*भायर खनतंत 'थावी'*
*श्यात तेंचा पिकान येता*
*घरदार भऱ्हान व्हावता*
*तसा माका जमाचा नाय*
*चुलीवर आता ठेव काय?'*

असे स्वतःशीच बोलणारी कारभारीण, किंवा भर्जरी साड्यांच्या गराड्यात, 'अंग चोरीत, स्वतःला सावरत बसल्या जागेवरच आक्रसत' राहणारी, 'शेणागोवरीत कुजलेल्या बोटांना पदराआड दडवीत अधिकच कावरीबावरी होणारी' ती. या स्त्रिया विशिष्ट आहेत. तशीच 'कुजबुजतील कान', 'ती', 'अंधार पडलाच तर', 'खूप दिवस झाले शहरात', 'संवाद' या कवितांतील 'ती' ('तू') हीही विशिष्ट आहे. (या काही कविता खास जाणवू न देता पत्नी-सहचारिणीसंबंधीच्या आहेत आणि त्यांतून व्यक्त होणाऱ्या जाणिवा आणि अनुभव मराठी काव्यविश्वात अनोखे







ठरणारे आहेत.) या सर्वच स्त्रीविषयक कवितांना गाव वेढून आहे. 'झऱ्यापाशी उभ्या राहून घागर भरणाऱ्या बायका', 'नदीच्या पात्रात चुळबुळणाऱ्या पोरी', 'लाकूडफाट्याचं आभाळ घेऊन सावल्या लांबत जाताना धावणाऱ्या बायका', 'दावणीला जुंपावेत बैल... असा कामाचा रगाडा उपसत रानावनात अखंड दिवस घालणाऱ्या बायका' याप्रमाणे. किंबहुना, अजय कांडर यांचे सारे अनुभवविश्व गावाशी आतड्याने जुळलेले आहे. या गावातल्या बायका, मुली, परकर-पोलक्यातल्या पोरी, म्हाताऱ्या बायका या तर आहेतच, पण 'वासरांसाठी हंबरणाऱ्या गायी', 'तटकी करडाने सजलेला गोठा', 'मुजोरपणाने उभे असलेले वळू' असे प्रतीकांमधून, प्रतिमांमधून प्रत्यक्ष उभे राहणारे गाव या सबंध संग्रहात ठिकठिकाणी भेटत जाते. हळूहळू मला जाणवत गेले, की 'गाव' ही या संग्रहामागची आत्मखूण आहे आणि त्यातल्या बायका, माणसे, पशू, पक्षी, पाऊस न पडल्याने सुकून गेलेली झाडे यांच्याशी, त्यातील वास्तवाशी स्मृतिरूपाने बांधला गेलेला हा कवी हे गाव कसे बदलत चालले आहे हे टिपतो आहे. प्रथम काही कवितांत टीव्ही, रेडिओ यांचे उल्लेख येतात, पण ते बदल दाखवण्यासाठी नव्हे. टीव्हीवरची दृश्ये पाहणारी नातवंडे आहेत. आता,

*'त्यांना आवडतात*
*तोकड्या कपड्यांतल्या युवक-युवतींची नाचगाणी*
*आजीच्या अंगाईपेक्षा...'*

पण मग हळूहळू सारेच बदलते. 'घराचे गोठे होताहेत, बैल वेभान होताहेत, 'नातं-गोतं, गणगोत फिसकटल्यासारखी नजर' नंतर 'हे कळप माणसांचे की गिधाडांचे... कळपाकळपाने होतायत हल्ले आणि माणसं वाचवू पाहताहेत जीव'... पुढे 'राडे होऊ लागतात', 'गाव शांत असतो अधूनमधून' आणि

*'मुलं म्हणाली,*
*आम्हाला एक महिना सुट्टी दिलीय गुरुजींनी*
*निवडणूक आलीय,*
*आधी पक्षाचा मेळावा होईल*
*मग नुसतीच पाहतील माणसे एकमेकांकडे*
*तिरक्या नजरेने...'*

'झाड'सारख्या कवितेत हा बदल प्रतीकांतून सूचित होतो-

*'हल्ली मोसमानुसार बदल होत नाही,*
*सारे ऋतु देताहेत हुलकावणी*
*नाकारून झाडाचे अस्तित्व,*
*याची झाडालाही माहिती आहे पुरेशी...'*

'अजूनही गावात', 'घुमत नाही शीळ कानात', 'तर ते वडवतील ढोल, ताशे', 'फरक' अशा कवितांमधून माणसामाणसांमधील संबंध पूर्वीसारखे राहिलेले नाहीत याचे वर्णन करणाऱ्या प्रतिमा येतात. दिवसेंदिवस घट्ट होत जाणारी जमीन', 'कधी दिवा पेटवू पाहतात, तर वातच हरवलीय, तेल संपून गेलंय, तरी माणसं शोधताहेत उजेडाला', 'माणसं अंधाराशीच बोलतायत...', 'संगत बदलून एकटीच चालतायत...' किंवा

*'ह्या बंद दरवाज्याच्या आत*
*ऐकू येतायत मला त्यांच्या गावगप्पा*
*जसा वादळाचा आवाज...'*

माणसे एकमेकांना परकी होताहेत. दुसऱ्याबद्दल अविश्वास येऊ लागला आहे. ती स्वार्थी होताहेत, मतलबी. जसे,

*'आपणच आपल्यासाठी झगडायचं असतं,*
*किंवा, आपले सगेसोयरे राबत असतात...*
*स्वतःला गाडून घेत गुडघाभर...*
*याची जाणीवही नसते त्यांच्या चेहऱ्यावर, म्हणून तर ते*
*आपल्या आयुष्याचा भार सोपवतात बिनधास्तपणे...*
*कर्तव्यनिष्ठ आप्तेष्टांवर आणि उपभोगू पाहतात*
*जगण्याचा प्रत्येक क्षण...'*

दिवसही बदलले, काळ बदलला. 'कारखान्यांची धुराडी पडलीयत बंद, शहरं ओस पडतायत आणि 'रिकाम्या होऊन आलेल्या' माणसांचे थवेच्या थवे गावात येऊन आसरा शोधताहेत. या बदललेल्या काळाने, माणसांमधील बदलांमुळे कवी किती अस्वस्थ आहे हे कवितांमागून कविता वाचताना जाणवत राहते. पण तो स्मरणरंजनात बुडत नाही. वास्तवावरून त्याची नजर हटत नाही. ही अस्वस्थता केवळ भोवतीच्या वास्तवाबद्दलच नाही, स्वतःच्या स्थितीबद्दलही आहे. निर्मितीवर, सृजनावरही या अस्वस्थतेचा परिणाम होतो आहे. 'कवितेचा 'क'ही उतरला नाही कागदावर'. 'दुबार पेरणी करूनही सारंच वियाणं चिम् निपजावं' तसा प्रत्येक दिवस वाया जातो, बांध फुटून वाहून गेलेल्या शेताकडे हताशपणे पाहत राहावं' तसे वाटत राहते. 'कळत्या नकळत्या वयात' ही आत्मचरित्रात्मक कविता स्वतःच्या आयुष्याचा, इतरांशी असलेल्या संबंधाचा, 'स्व' आणि 'इतर' यांच्यात होत गेलेल्या पालटाचा, विघडत गेलेल्या, सर्वार्थाने अधःपतित होत गेलेल्या सामाजिक वातावरणाचा प्रश्नांकित वेध घेत जाते.

'आवानओल' जिथे संपतो तिथेच 'हत्ती इलो'ची रुजवण झाली असावी असे स्पष्ट संकेत 'आवानओल'च्या उत्तरार्धातील कविता वाचताना मिळतात. 'कळत्या नकळत्या वयात' या कवितेचे वळण 'मी'कडून 'आम्ही'कडे जाते. पुढे 'मी' हा 'आम्ही' बनतो. 'मी' 'त्याच्या'विषयी बोलू लागतो. आत्मपरीक्षण, आत्मनिर्भर्त्सना यांचे टप्पेही येतात. समाजातील ढोंग, बापू, बाबा, शास्त्री यांचे वाढत गेलेले स्तोम; 'धर्म', 'अध्यात्म' यांना मिळत गेलेले विपरीत संदर्भ आणि पुढची राजकारणाची समाजावर झालेली कुरघोडी, अशा वाढत्या क्रमाने ही कविता बदललेल्या विपरीत स्थितीत 'मी'चा, पर्यायाने प्रत्येकाचाच संकोच कसा होत जातो आहे ते औपरोधिक शब्दांत व्यक्त करीत जाते. 'आवानओल'मध्ये दिवसागणिक वाढत गेलेली अस्वस्थता पुढे समाजस्थितीसंबंधीच्या भाष्यात फुटून येते. डोळसपणे



अनुक्रमणिका

न्याहाळलेल्या समाजाचा आणि राजकारणाच्या आक्रमणाचा वेध घेते.

'हत्ती इलो' ही अजय कांडर यांची दीर्घकविता २०१२ साली शब्द प्रकाशनाने प्रकाशित केली. या कवितेचा काही भाग त्यापूर्वी काही अनियतकालिकांतून प्रकाशित झाला होता. याचा अर्थ ही दीर्घकविता भावकवितेच्या ऊर्मीने लिहिली गेली नव्हती, तर काहीशा वैचारिक प्रक्रियेतून तिची निर्मिती होत गेली. याचा परिणाम तिच्या स्वरूपावरही झालेला दिसतो. 'हत्ती इलो'- हत्ती आले, हत्तींची झुंड आली. आक्रमक, विध्वंस करणारे भव्य, हिंस्र, भयावह प्राणी चालून येत आहेत, असा भयसूचक इशारा देणारे हे शीर्षक आहे आणि ते स्पष्टपणे प्रतीकात्मक आहे. या संग्रहासाठी वाळ ठाकूर यांनी अप्रतिम रेखाचित्रे काढली आहेत. आडदांड हत्ती ज्या दिशेने येत आहेत त्या दिशेकडे पाहणारा भयग्रस्त मानवी समूह त्यांनी मुखपृष्ठावर रेखाटलेला आहे. तथापि, ते भय, असहायता, काळजी या दीर्घकवितेत प्रत्ययकारी रीतीने उमटत नाही, याचे कारण कवी 'हत्ती' या सत्तेच्या प्रतीकात गुरफटलेला आहे आणि 'सत्तेचे राजकारण' या विषयाचे तो विश्लेषण करतो आहे. समाजजीवनात बदल घडवून आणणारे राजकारण आणि त्याचे परिणाम हा अजय कांडर यांचा अनुभूतीचा आणि विचारांचा परीघ 'हत्ती इलो'तून उभा झालेला आहे. त्यांनी ते ज्या परिसरात जगतात त्या परिसरातले बदलते समाजजीवन, ते गतिशील करणारे राजकारण हे जरी नजरेसमोर ठेवलेले असले तरी कमी-जास्त प्रमाणात ते महाराष्ट्राच्या इतरही प्रदेशांना लागू पडते. परंतु विशेषतः शांत, निसर्गरम्य, आर्थिकदृष्ट्या कमकुवत आणि धार्मिक आणि सांस्कृतिक परंपरांच्या आधारे जगणारा कोकण हा परिसर गेल्या पंचवीस-तीस वर्षांत कसा ढवळून निघाला आहे याचे चित्रण या दीर्घ कवितेत आले आहे. सत्तेची आस न ठेवता जनकल्याणाच्या भूमिकेतून समाजसेवेकडे वळलेले नेतृत्व कोकणातून निर्माण झाले, त्यामुळे सत्तेसाठी होणारा राजकीय संघर्ष तिथे निर्माण झाला नाही. माणसे परस्परांना सांभाळीत, जुळवून घेत समाधानाने जगत राहिली.

*'एखाद्या दुःखाच्या प्रसंगात*
*दुःखात डुंबून जायची माणसं*
*आणि एकमेकांच्या दुःखाचे वाटेकरी होताना*
*सर्वांच्या घरात*
*एकच प्रसंग कोसळल्याची जाणीव व्हायची*
*त्रयस्थ माणसाला...'*

'हत्ती' हे सत्तेचे प्रतीक. स्वातंत्र्यपूर्व काळातही लोकांनी या हत्तीचा जुलूम सोसला होताच. तो कमी झाला. राजसत्ता हाती घेतलेल्या लोकनायकांनी माणुसकीचा गुणधर्म न सोडता लोकांची मने जिंकली. पाठीराखे, समर्थक निर्माण झाले. आणि नंतर 'नव्या हत्तींचे आगमन' झाले! या नव्या हत्तींने भोवतीच्या माणसांचा प्रथम कब्जा घेतला. पूर्वी जे जाणत्या लोकनायकाचे पाठीराखे होते ते या नव्या हत्तींचे समर्थक झाले आणि हत्तींची एक फौजच निर्माण झाली.

*'बघता बघता हत्तीने देवरूप घेतल्याची*
*एक आख्यायिकाच बनून गेली त्या प्रदेशाची*
*आता माणसं रोज सकाळी उठतात,*
*त्याला नमस्कार करतात*
*आणि आपल्या आयुष्याचा सारा भार*
*त्याच्यावर सोपवून*
*दारोदार फिरतात त्याच्यासोबत...'*

हळूहळू ही कविता कोकणात पद्धतशीरपणे स्वतःचे सामर्थ्य व वर्चस्व प्रस्थापित करणाऱ्या राजकारण्याचे प्रतीकात्मक वर्णन करण्यात अडकते. हे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी जनतेत संभ्रम निर्माण करणे, समर्थकांची फळी निर्माण करणे, जनतेला खोटी स्वप्ने दाखवणे आणि त्यांची विचारशक्ती नष्ट करीत त्यांना आपल्या कच्छपी लावणे, अशा पायऱ्या ओलांडीत त्या राजकारणी पुरुषाने 'एक-एक गावच कावीज' कसा केला याचे वर्णन केले आहे. 'हत्ती'च्या या आक्रमणाने, त्याच्या दहशतीने 'पंगू होऊ लागले त्यांचे मन, त्यांचे विचार, त्यांची शक्तीही... माणसं घरोदारी बंदिस्त झाली... माणसं जीव मुठीत धरून जगू लागली, ...माणसं प्रचंड भयभीत झाली...'

हत्ती इलो
अजय कांडर

अजय कांडर यांनी पत्रकारिता केली आहे. भोवतीचे वास्तव आणि त्यातील बदल यांनी बारकाईने टिपले आहेत. 'हत्ती इलो' या कवितेत त्यांच्यातील संवेदनशील कवीपेक्षा त्यांच्यातील विश्लेषक पत्रकार प्रभावी होतो असे माझे वैयक्तिक मत आहे. कवीने विश्लेषक असू नये असे नाही. विश्लेषक, वैचारिकतेचे वजन पेलणारे मर्ढेकर-मुक्तिबोधांसारखे कवी कवितेचे कवितापण आपल्या वैचारिकतेने अधिक पिळदार आणि सघन करताना आपण अनुभवले आहेत. त्यासाठी कवितेचा, काव्यात्मतेचा 'ठावो' न सोडणे गरजेचे असते. तसे न झाल्याने ही दीर्घकविता गद्याकडे झुकत जाते. तथापि, ही त्यांच्या काव्यप्रवासातील एक अवस्था असावी अशी आशा करायला हरकत नाही.

◆

**प्रभा गणोरकर**
चलभाष : ९५४५४६१७७७



# प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प

## सुजाता शेणई











**वाचक आणि प्रकाशक यांचं नातं अतूट असतं. वाचनसंस्कृती वाढवण्याची आणि ग्रंथप्रसाराची मोठी जबाबदारी साहित्य व्यवहारातल्या या दोन महत्त्वाच्या घटकांवर अवलंबून असते. अनेक प्रकाशक चांगल्या व गांभीर्याने वाचन करणाऱ्या वाचकांसाठी अनेक प्रकल्प हाती घेऊन साहित्याचं दालन समृद्ध करत असतात.**

**अशाच काही मराठी प्रकाशन संस्थांचा आणि त्यांच्या विविध प्रकल्पांचा परिचय 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरातून देत आहोत.**

**या अंकात 'शब्दालय' या प्रकाशनसंस्थेच्या प्रवासाविषयी, भूमिकेविषयी तसेच त्यांच्या विविध प्रकल्पांविषयी 'शब्दालय'च्या सुमती लांडे यांच्याशी साधलेला संवाद.**

अहमदनगर जिल्ह्यातील श्रीरामपूर हे आडवाजूचं तालुक्याचं गाव, पण या गावातील 'शब्दालय' प्रकाशन मात्र मराठी वाचकांना चांगलंच परिचयाचं आहे. श्रीरामपूर आणि शब्दालय प्रकाशन दोहोंना ठळक नाव मिळवून देण्याचं काम केलं आहे कवयित्री, लेखिका, संपादिका आणि प्रकाशिका सुमती लांडे यांनी. १९८९मध्ये सुरू झालेल्या या प्रकाशनाने दोन-अडीच दशकांत चांगलं नाव मिळवलंय. अर्थात यासाठी सुमती लांडे यांची चिकाटी, परिश्रम, पुस्तकं घेऊन गावोगाव फिरण्याची तयारी, साहित्यावरचं प्रेम आणि माणसांवरचा प्रचंड विश्वास कारणीभूत आहे. सुमती लांडे यांच्याशी संवाद साधून जाणून घेतलेली त्यांची ही थक्क करणारी वाटचाल...

**'शब्दालय'चा प्रवास कसा सुरू झाला?**

शब्दालय प्रकाशन नंतर सुरू झालं. आधी शब्दालय पुस्तक भांडार सुरू झालं. हे सुरू करण्यामागे थोडी वेगळी आणि वैयक्तिक पार्श्वभूमी होती. अकरावीत असताना वयाच्या अगदी सोळाव्या वर्षी माझं लग्न झालं. लग्नानंतर मी एम.ए. बी.एड., एम.फिल.पर्यंत शिक्षण पूर्ण केलं. शिक्षण पूर्ण झाल्यानंतर एका संस्थेत प्राध्यापक पदासाठी मुलाखतीला गेले. मुलाखत चांगली होऊनही काही कारणास्तव माझी निवड केली गेली नाही, हे समजल्यावर त्या क्षणी निर्णय घेतला, की यापुढे नोकरीचा विचार बंद, नोकरी करायची नाही. नोकरी करायची नाही तर काय करायचं, याचा विचार सुरू असताना पुस्तकांचं दुकान काढावं असं वाटलं. कारण मला स्वत:ला वाचनाची खूप आवड होती आणि मी कविताही करत होते. माझ्या या निर्णयाला सुरुवातीला माझ्याच घरातल्यांनी विरोध केला; पण माझ्या निर्णयावर मी ठाम होते. घरच्यांनी विरोध केल्यामुळे त्यांच्याकडून दुकानासाठी पैसे मिळण्याची शक्यता नव्हतीच. मग मी सुशिक्षित बेरोजगार योजनेखाली बँकेकडून पंचवीस हजार रुपयांचं कर्ज घेतलं. त्यातून दुकानासाठी एक शेड बांधली आणि एकटीने पुण्याला येऊन पुस्तकं खरेदी केली. ही गोष्ट १९८३मधली. दुकानाचं नाव ठेवलं 'शब्दालय पुस्तक भांडार'. या पुस्तक भांडाराच्या उद्घाटनाला ज्येष्ठ कवी ना. धों महानोर यांना निमंत्रित केलं होतं. त्यांच्या हस्ते उद्घाटन





अनुक्रमणिका








# नवी पिढी नव्या तंत्रज्ञानासह प्रकाशन व्यवसायात उतरली पाहिजे

## सुमती लांडे

केलं आणि माझा या क्षेत्रातला प्रवास सुरू झाला. पुढे श्रीरामपुरातील अशोकनगर इथे एक साहित्य संमेलन आम्ही भरवलं. तिथे ग्रंथाली वाचक चळवळीतील काही मंडळींशी परिचय झाला व त्यातूनच 'ग्रंथाली'चं केंद्र श्रीरामपूरमध्ये सुरू केलं. पुस्तक भांडार सुरू केलं, पण ते गावाच्या बाहेर होतं त्यामुळे गिऱ्हाईक कमी होतं. यावर उत्तर म्हणून श्रीरामपूर स्टेशनजवळ बांबूचा पाल बांधला आणि पुस्तकं विकायला सुरुवात केली. तिथेही फारसा प्रतिसाद मिळत नव्हता. मग मी आजूबाजूच्या परिसरातील शाळांत गाडीवर पुस्तकं घेऊन जायचे. शाळांचा मात्र चांगला प्रतिसाद मिळाला. त्यामुळे सुरुवातीच्या काळात बराच आधार मिळाला.

**शब्दालय दिवाळी अंकाची सुरुवात कशी झाली?**

शब्दालय पुस्तक भांडाराच्या खरेदीसाठी मला अनेकदा पुण्या-मुंबईला जायला लागायचं. त्यात दरवर्षी दिवाळी अंकाची खरेदी असायची. भरपूर दिवाळी अंक इथे पाहायला मिळायचे. हे दिवाळी अंक वाचत असताना असं लक्षात आलं, की यात जे जाहिरातदार आहेत ते बरेचसे नगरकडचे आहेत. अंकाला जाहिरातींचं बळ लागतं. आपण जर यांच्याकडे गेलो आणि चांगल्या विषयाला धरून दिवाळी अंक काढला तर? त्यातूनच मग आपण एक दिवाळी अंक काढावा, असं मला वाटू लागलं. बरेच दिवस हा विचार मनात घोळत होता, पण दिवाळी अंक काढण्यासाठी काय काय गोष्टींची आवश्यकता असते याची पुरेशी माहिती नव्हती. मग जवळच्या अनेकांशी चर्चा केली; पण दिवाळी अंक काढणं एवढं सोपं काम नाही, असंच सर्वांनी मला सांगितलं. तरीही, एक अंक काढून तर पाहू, असा निर्णय पक्का केला. त्यासाठी डॉ. र. बा. मंचरकर सर, चित्रकार मित्र श्रीधर अंभोरे यांनी सहकार्य करण्याचं आश्वासन दिलं. मग सर्व तयारी करून १९८५मध्ये पहिला दिवाळी अंक काढला. त्याचंही नाव 'शब्दालय' असंच ठेवलं. पहिल्याच दिवाळी अंकाला चांगला प्रतिसाद मिळाला. तीन पुरस्कार मिळाले. त्यामुळे खूपच उत्साह वाटला. मग पुढे २००८पर्यंत विनाखंड शब्दालय दिवाळी अंक प्रकाशित झाला. विशिष्ट विषय घेऊन त्याभोवतीच मी सर्व



अंक केले. माझ्या प्रकाशनाच्या वाढत्या पसाऱ्यात दिवाळी अंकाचं काम मधल्या काही काळात खंडित झालं होतं. यंदा २०१५ मध्ये 'शब्दालय'चा दिवाळी अंक पुन्हा सुरू झाला. या वर्षीचा 'प्रसारमाध्यमे विशेषांक' केला आहे, ज्याची अधिकतर जबाबदारी मुलगा सुमित आणि सून मृण्मयीने घेतली आहे.

**'शब्दालय प्रकाशन'चा प्रवास कसा सुरू झाला?**

शब्दालय पुस्तक भांडार १९८३ मध्ये, शब्दालय दिवाळी अंक १९८५मधे आणि प्रकाशन १९८९मध्ये सुरू झालं. शब्दालय दिवाळी अंकाच्या जाहिरातींसाठी मी मुंबईला साहित्य संस्कृती मंडळाच्या कार्यालयात जात असे. तेव्हा तिथे पंढरीनाथ पाटील अधिकारी होते. त्यांच्याशी थोडा परिचय झाला होता. त्यांनी एकदा विचारलं, ''तुम्ही साहित्य संस्कृती मंडळाची पुस्तकं का करत नाहीत? तुम्हाला अनुदान मिळवून देतो.'' मग साहित्य संस्कृती मंडळाची काही पुस्तकं केली. पण खऱ्या अर्थाने शब्दालय प्रकाशनाला सुरुवात झाली ती १९८९ मध्ये. आणि साहित्य संस्कृती मंडळाव्यतिरिक्त काढलेलं पहिलं पुस्तक म्हणजे नामदेव देसाई यांचा 'पंचनामा' हा कथासंग्रह. शब्दालय प्रकाशनाकडे मग मी गांभीर्याने पाहू लागले. विशिष्ट उद्दिष्ट समोर ठेवून कामाला सुरुवात केली. १९९५ मध्ये ज्येष्ठ कादंबरीकार रंगनाथ पठारे यांची 'दुःखाचे श्वापद' ही कादंबरी शब्दालयने प्रकाशित केली. आणि मग पुढे अनेक लेखक शब्दालयशी जोडले गेले. आज शब्दालयची चारशेच्या वर पुस्तकं प्रकाशित आहेत. चांगले लेखक आमच्या प्रकाशनाकडे आपणहून येत आहेत. थोडंसं अभिमानाने सांगावंसं वाटतं, की मुंबई-पुण्याबाहेर असूनही शब्दालय प्रकाशनाने आपली वेगळी ओळख प्रकाशन क्षेत्रात निर्माण केली आहे.

**प्रकाशन व्यवसायात वितरणाची व्यवस्था महत्त्वाची असते. ती कशी केलीत?**

पुस्तकं नुसती छापून भागत नाहीत. ती वाचकांपर्यंत पोहोचवणं महत्त्वाचं असतं. सुरुवातीला मी वितरकांकडे, विक्रेत्यांकडे पुस्तकं विक्रीसाठी दिली. मुंबई, पुणे ते नागपूरपर्यंत; पण तो अनुभव फारसा बरा नाही. अगदी नामवंत संस्थांचादेखील. पुस्तकांचा हिशोब नाही, पैसेही नाहीत. काही वेळा पूर्णपणे गाळात फसावं लागलं. यावर उपाय म्हणून वितरण. मी ते स्वतः करायला सुरुवात केली. तेव्हाही आणि आजही मी स्वतः वितरण करते. सुरुवातीला उकलगाव, अशोकनगर, कोलार या शेजारच्या गावांत मी जायची. शाळांमध्ये साडेबारा टक्के निधी उपलब्ध असायचा, त्यामुळे शाळेत पुस्तकं खपायची. नंतर मी स्वतःची गाडी घेतली. त्यात पुस्तकं भरायची आणि गावोगाव जायचं. मोठ्या शहरात जाण्यापेक्षा मी लहान गावात जाऊन पुस्तकं विकण्यावर भर दिला. जिथे पुस्तकांची प्रदर्शनं ही बाब दुर्मिळ आहे तिथपर्यंत पोचायचा मी प्रयत्न करते. अनेक महाविद्यालयांमध्ये जाते. हे काम माझ्या आनंदाचं असल्याने मला फिरण्याचा कंटाळा येत नाही. खूप प्रवास करते मी. त्यामुळे गावागावांतील लोकांशी संपर्क राहिला आहे. आजही लोक मला फोन करून पुस्तकं मागवतात तेव्हा खूप समाधान वाटतं.

**लेखक शोधून काढणे, विषयांत वैविध्य आणणे, वाचकांना दर्जेदार साहित्य देणे यासाठी कोणते प्रयत्न करता?**

कोणत्याही प्रकाशनसंस्थेला चेहरा मिळतो तो त्या संस्थेच्या लेखकांमुळे आणि मौलिक साहित्यकृतींमुळे. 'शब्दालय' या दोन्ही बाबतींत भाग्यवान आहे. नव्या-जुन्या पिढीतील, महाराष्ट्राच्या सर्वच भागांतील लेखकांचं दर्जेदार साहित्य 'शब्दालय'ने आजवर प्रकाशित केलं आहे. आणि खरं सांगायचं तर मला लेखक, कवी शोधायला फारसा आटापिटा करावा लागला नाही. मी स्वतः कवयित्री आहे. त्यामुळे मी कवितासंग्रह फार प्रेमाने करते हे कवींना माहिती आहे. त्यामुळे अनेक कवी माझ्यापर्यंत पोहोचतात. मी त्यांची कविता वाचते. आवश्यक ती चर्चा, सूचना करून संग्रह काढला जातो. श्रीकांत देशमुख, प्रवीण बांदेकर, अजय कांडर, ऐश्वर्य पाटेकर असे अनेक कवी शब्दालयशी जोडले गेले आहेत. ऐश्वर्य पाटेकरच्या 'भुईशास्त्र' कवितासंग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे. त्याचबरोबर शब्दालय दिवाळी अंकातून काही लेखक मिळतात. लोकसंपर्क भरपूर असल्याने कोणी मित्र-मैत्रिणी सुचवतात.

महत्त्वाच्या लेखकांमध्ये भाऊ पाध्यांचा शेवटचा कथासंग्रह 'शब्दालय'ने प्रकाशित केला आहे. त्याचबरोबर रंगनाथ पठारे यांच्या 'एका आरंभाचे प्रास्ताविक', 'नामुष्कीचे स्वगत', 'दुःखाचे श्वापद', 'रथ' आदी कादंबऱ्या; प्रवीण दशरथ बांदेकरांची 'चाळेगत', राजन खान यांची 'यतीम' आदी कादंबऱ्या 'शब्दालय'ने प्रकाशित केल्या. दिलीप चित्रे, राजन गवस, सदानंद देशमुख, विलास सारंग, द. ता. भोसले यांसारख्या महत्त्वाच्या लेखकांचे कथासंग्रह, डॉ. दिलीप धोंडगे, रंगनाथ पठारे, सतीश बडवे, म. सु. पाटील, डॉ. पुष्पलता राजापुरे-तापस यांचे समीक्षात्मक ग्रंथ 'शब्दालय'ने प्रकाशित केले. आज महाराष्ट्राच्या सर्वदूर भागांतले अनेक चांगले लेखक 'शब्दालय'शी जोडले गेले आहेत याचं विशेष समाधान आहे.

या सगळ्या प्रवासात प्रभाकर कोलते, धनंजय गोवर्धने, भ. मा. परसावळे, श्रीधर अंभोरे या चित्रकारांचेही मनोमन

सहकार्य मिळाले आहे.

**'शब्दालय'ने आतापर्यंत केलेले आणि करत असलेले प्रकल्प कोणते ? त्यामागची आपली भूमिका काय आहे ?**

वडोद्याच्या सयाजीराव गायकवाड विद्यापीठाने काढलेली आणि नंतर ज्यांची आवृत्ती संपली अशी दुर्मिळ आणि महत्त्वाची पुस्तकं, ज्यात 'लौकिक दंतकथा' (गोविंद कालेलकर), 'जातकातील निवडक गोष्टी' (चिं. वि. जोशी) यांसारख्या पुस्तकांचा समावेश आहे. ही आणि यांसारखी इतर पुस्तकं पुनर्मुद्रित केली. चांगली समीक्षा लिहिली गेली पाहिजे आणि वाचली गेली पाहिजे असं मला मनापासून वाटतं. कवितेकडे किती बाजूंनी पाहता येतं, किती चांगल्या पद्धतीने समजून घेता येतं हे समजण्यासाठी उत्तम समीक्षा वाचकांच्या, अभ्यासकांच्या समोर आली पाहिजे. समीक्षा व्यवहार समोर ठेवून डॉ. दिलीप धोंडगे यांचं तुकाराम महाराजांच्या अभंगांचं निरूपण करणारी 'तुका म्हणे - भाग १' आणि 'तुका म्हणे - भाग २' ही पुस्तकं काढली. म. सु. पाटील यांची 'ज्ञानेश्वरीचा तृष्णाबंध', 'साहित्याचे सामाजिक व सांस्कृतिक अनुबंध', 'कवितेचा रूपशोध' ही समीक्षेला वाहिलेली पुस्तकं काढली. भालचंद्र नेमाडे यांच्या 'देखणी' कवितासंग्रहावरील समीक्षेचं संपादन 'देखणीसंबंधी'मधे एकत्रित केलं, तर त्यांच्याच 'टीकास्वयंवर'वर आधारित 'आणिक टीकास्वयंवर' हे समीक्षात्मक पुस्तक प्रकाशित केलं. त्याचबरोबर दिलीप चित्रे, प्रभाकर बागले, केशव सदरे, वासुदेव सावंत, सु. म. तडकोडकर, श्रीकृष्ण अडसूळ यांचंही समीक्षात्मक लिखाण 'शब्दालय'ने प्रकाशित केलं.

रंगनाथ पठारे यांच्या लिखाणाच्या पंचविशीनिमित्त आम्ही इ.स. २००० मध्ये इगतपुरी इथे तीन दिवसांचं संमेलन आयोजित केलं होतं. त्यासाठी ज्येष्ठ कादंबरीकार भालचंद्र नेमाडे यांची प्रमुख उपस्थिती होती. नेमाडे यांना बोलतं करण्यासाठी, त्यांचं साहित्य समजून घेण्यासाठी विविध क्षेत्रांतील चाळीस जाणकारांनाही निमंत्रित केलं होतं. खूप चांगली चर्चा झाली. धनंजय गोवर्धने यांनी या अनौपचारिक चर्चेचं शूटिंग करून ठेवलंय. त्याच वेळी माझ्या मनात आलं. की नेमाडे सरांचा प्रवास ज्या ज्या गावातून झाला तो सर्व प्रवासच त्या त्या गावात जाऊन चित्रित करावा. नेमाडे सरांना त्याबद्दल विचारलं असता तेही तयार झाले. आणि मग त्यांच्यासहित त्यांच्या मूळ गावी म्हणजे सांगवी इथे चित्रीकरण केलं. पुणे, मुंबई, धुळे, नगर, औरंगाबाद इथेही चित्रीकरण केलं आहे. नेमाड्यांविषयीचं चांगलं एकत्रित झालंय. लवकरच त्याची डॉक्युमेंटरी करायचा विचार आहे. तशाच पद्धतीचं काम रंगनाथ पठारे यांच्यावरही करायचं आहे.

मी गावोगावी खूप फिरते. माझ्या असं लक्षात आलं

आहे, की महाराष्ट्रभर खूप चांगल्या कवयित्री आहेत. त्या विखुरलेल्या आणि दुर्लक्षित आहेत. आज कवयित्री म्हटलं की मोजक्या कवयित्रींची नावं समोर येतात. त्यांच्या पलीकडे जाऊन या दुर्लक्षित, विखुरलेल्या कवयित्रींची कविता एकत्रित करायची आहे. ही कविता जास्तीत जास्त वाचकांपर्यंत कशी पोचवता येईल याविषयीचं काम मी सुरू करत आहे.

सुमती लांडे
शब्दालय प्रकाशन,
श्रीरामपूर
चलभाष : ९८२२००८७९६

**नवोदित कवी, लेखकांकडून आपल्या काय अपेक्षा आहेत?**

अनेक नवोदित कवींचं वाचन खूप कमी आहे, असं माझं निरीक्षण आहे. त्यांनी नवी-जुनी कविता खूप वाचली पाहिजे. कविसंमेलनात आज काय चित्र दिसतं? कवी आपली स्वत:ची कविता वाचतात आणि उठून जातात. हे चांगलं नाही. कवितेच्या जोडीला कथा, कादंबरी आणि इतर ललित वाङ्मयही भरपूर वाचलं पाहिजे. लेखकाने किंवा कवीने अल्पसंतुष्ट राहता कामा नये. स्वत:ची समज वाढवणं फार गरजेचं आहे. नवोदित मंडळी साहित्य प्रकाशित करण्याची फार घाई करतात. तशी घाई करू नये, असं मला वाटतं.

**स्त्रीविचारी किंवा स्त्रीवादी साहित्याचं आपण समर्थन करता, यामागे आपली काय भूमिका आहे?**

मी स्त्रीवादी नाही तर माणूसवादी आहे. स्त्री-पुरुष हे नैसर्गिक आहे. स्त्री म्हणजे करुणा, स्त्री म्हणजे कणव, असं म्हणून आपण तिला गरीब करतोय का? स्वत:कडे स्त्री म्हणून सहानुभूती घेणं हे खरंच तिला तरी आवडतंय का? असे अनेक प्रश्न मला सतत पडत असतात. प्रेम, जिव्हाळा, संवेदनशीलता हे स्त्री आणि पुरुष दोघांकडेही आहे. स्त्रीस्वातंत्र्य म्हटलं तर मग ते स्वातंत्र्य म्हणून तिला पेलता आलं पाहिजे. स्त्री अतिशय कणखर आहे यावर माझा विश्वास आहे.

**मराठीत स्त्री प्रकाशकांची संख्या कमी आहे, याविषयी काय सांगाल?**

प्रकाशनसंस्था चालवणं हे काम फार कष्टाचं आणि जिकिरीचं असल्याने कदाचित ही संख्या कमी असेल. प्रकाशनसंस्थेचं काम सात-आठ स्तरांवर चालतं. लेखन, वाचन, निवड, डीटीपी, मुद्रितशोधन, मांडणी, छपाई, वितरण, वसुली, प्रकाशन समारंभ इ. अनेक गोष्टींचा समन्वय त्यामध्ये साधावा लागतो. साहित्य संमेलनात, ग्रंथप्रदर्शनात सहभाग घ्यायचा असेल तर त्याची जवाबदारी घेणं, या व अशा अनेक कामांसाठी खूप वेळ द्यावा लागतो आणि कष्टही भरपूर करावे लागतात. वसुलीसाठी तर फार व्याप करायची तयारी असावी लागते. अर्थात, पुरुष प्रकाशकांची संख्या जास्त आहे, पण त्यांना मदत करायला घरातल्या स्त्रियाच आहेत हेही दिसून येतं आहे. स्त्रिया कोणतंही काम फार मनापासून करताना दिसतात. म्हणून या व्यवसायात त्यांचं योगदान वाढलं पाहिजे असं मला मनापासून वाटतं.

**तंत्रज्ञानाचा प्रकाशन क्षेत्रावर जो परिणाम झाला आहे त्याबद्दल काय सांगाल?**

तंत्रज्ञानाचा विकास झाला आहे, तो झपाट्याने होत आहे हे मान्य करायलाच हवं. तंत्रज्ञान वाचनसंस्कृतीला वाढावा देण्यासाठी उपयुक्तच आहे. तंत्रज्ञानाचा चांगला वापर या क्षेत्रासाठी का नाही करून घ्यायचा? अर्थात ई-पुस्तक ही संकल्पना रुजत असली तरी पुस्तक हातात घेऊन वाचणारा वाचकवर्ग आजही भरपूर आहे. ई-पुस्तक वाचणारे शहरापुरते अधिक असतील, पण महाराष्ट्रभर विखुरलेला वाचकवर्ग पुस्तकाची मागणी करतो. पुस्तक हातात घेऊन वाचण्यातला आनंद त्याला अधिक समाधान देऊन जातो. लोकसंख्या वाढत आहे तसा वाचकवर्गही वाढत आहे. त्यामुळे मराठीचं काय होणार, म्हणून घाबरून जाण्याची परिस्थिती अजिबात नाही. मराठीला चांगले दिवस होते आणि आजही आहेत.

**मराठी प्रकाशन व्यवसायाच्या स्थिती आणि गतीविषयी काय सांगाल?**

मौज, पॉप्युलर, पद्मगंधा यांच्याकडे आता नवीन पिढी तयार होते आहे. ही पिढी वेगळ्या पद्धतीने विचार करते. पारंपरिक भाग आता कमी होणं स्वाभाविक आहे. या नवीन पिढीने नवीन तंत्रज्ञानासह या क्षेत्रात उतरलं पाहिजे. पूर्ण व्यावसायिक म्हणून प्रकाशनसंस्था चालवली पाहिजे. असं झालं तर बदल नक्कीच घडेल. चांगला लेखक, प्रकाशक आणि तंत्रज्ञान यांचा चांगला समन्वय या पिढीने घडवून आणला तर आताच्या परिस्थितीत अधिक चांगला बदल होईल, वाचनसंस्कृतीला वाढावा मिळेल, असं मला वाटतं.

गेली २०-२५ वर्षं मी या व्यवसायात असून अजून तरी मला याचा कंटाळा आलेला नाही. कारण यातून मला मिळणारा आनंद खूप आहे. वाचन, लेखन आणि त्यातून मिळणारं समाधान हाच माझा मोठा ठेवा आहे.

◆

प्रा. सुजाता शेणई
चलभाष : ९०११०१७९१६



अनुक्रमणिका



बाळकृष्ण रेणके



# वडार समाजाचे समाजशास्त्रीय संशोधन

**तरुण प्राध्यापक विनायक लष्कर यांचे वडार समाजावरील संशोधनाचे 'वडार समाज : समाजशास्त्रीय अभ्यास' हे पुस्तक अलीकडेच प्रकाशित झाले आहे. या पुस्तकाचे अंतरंग उलगडणारा ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्ते-अभ्यासक बाळकृष्ण रेणके यांचा लेख येथे प्रसिद्ध करीत आहोत.**

आपण लिहिलेले पुस्तक साधारणपणे आपल्या प्रियजनांना किंवा गुरुजनांना अर्पण करण्याची प्रथा आपणास माहीत आहे. 'वडार समाज : समाजशास्त्रीय अभ्यास' हे पुस्तकसुद्धा लेखक विनायक लष्कर यांनी आपले माता-पिता व गुरुवर्यांना अर्पण केलेले आहेच, परंतु त्यापुढे त्यांनी म्हटले आहे, की '...भटक्या विमुक्त समाजाच्या मरणप्राय कष्टांस कृतज्ञतापूर्वक अर्पण...' कष्टकऱ्यांस नाही, चळवळीस नाही तर कष्टांस, तेही मरणप्राय कष्टांस ते पुस्तक अर्पण केले आहे. हे मला नवीन वाटले. देशाचा, पर्यायाने साऱ्याच समाजाचा विकास वेगात साधायचा असेल तर कठोर परिश्रमाला पर्याय नाही, असे आपण सारेच म्हणतो. ते खरेही आहे. पण या प्रक्रियेत अभिप्रेत असलेले कष्ट... आवड-निवड असलेले, सुख-समाधान देणारे, योग्य मोबदला देणारे, नियमबद्ध कष्ट असतात. ते मरणप्राय कष्ट नव्हेत. जिथे केवळ जिवंत राहण्यासाठीच बारा महिने चोवीस तासांचे कष्ट अपुरे पडतात तिथे विकासाचा प्रश्नच उद्भवत नाही, अशा कष्टांस 'मरणप्राय कष्ट' असे लेखकाने म्हटले असावे असे मला वाटले. लिखाण केवळ वडार समाजावर असले तरी सर्वच भटक्या विमुक्त जमातींच्या मरणप्राय कष्टांची बोच हृदयात बाळगणारे व कष्टप्रतिष्ठेला महत्त्व देण्याची व्यापक जाण असलेले विचार वाटले म्हणून लगेच वाचायला घेतले.

खरे तर एम.फिल. पदवीसाठी 'सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठा'स सादर केलेले लेखकाचे हे समाजशास्त्रीय संशोधन साहित्य आहे. आत्मचरित्रपर लिखाण, ललित लेखन आणि सांस्कृतिक वर्णन इत्यादी साहित्यापासून हे वेगळे लिखाण असले, तरी आधी झालेल्या अशा सर्व प्रकारच्या लिखाणाचा आवश्यक तो मागोवा या पुस्तकात घेतला गेला आहे. लेखकाच्या वैयक्तिक मर्यादा व संशोधनाविषयीच्या निकषांच्या बंधनासह असलेली कालमर्यादा लक्षात घेता संशोधनकार्याला भौगोलिक क्षेत्रमर्यादा पडणे स्वाभाविक आहे. कृतिशील संशोधनासाठी लेखकाने आपली स्वत:ची 'वडार' ही जमात आणि पुणे शहर व त्याच्या परिसराचे मर्यादित क्षेत्र निवडले आहे.

जमातीची ऐतिहासिक पार्श्वभूमी, तिच्या उगमस्थानापासून भटकेपणाचे व स्थलांतराचे वेगवेगळे टप्पे, त्या त्या काळात तिच्यात झालेले बरे-वाईट बदल, ग्रामीण भागातून ढकलले जाणे व शहरीकरणाकडे ओढले जाणे, त्याची गरज किंवा नाइलाज आणि आजचे वास्तव या मुद्द्यांवर भटक्या विमुक्त जमातींच्या क्षेत्रात संशोधनात्मक कार्य व लिखाण फार कमी झालेले आहे. या पार्श्वभूमीवर विनायक लष्कर यांच्या या पुस्तकाचे महत्त्व वाढते. वाढत्या शहरीकरणात वडार समाज सांस्कृतिकदृष्ट्या कशा प्रकारे सामावला गेला, बदलत्या सामाजिक-आर्थिक व सांस्कृतिक पातळीवर त्याला कोणत्या व किती प्रमाणात तडजोडी कराव्या लागल्या, स्वतःची वांशिक ओळख तो टिकवू शकला का, वगैरे प्रश्नांच्या उत्तरांची उकल 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने या पुस्तकात बऱ्याच प्रमाणात स्पष्ट होताना दिसते.

पण एकूणच अनेक भटक्या विमुक्त जमातींच्या समाज घटकांबद्दल मात्र या लिखाणावरून निश्चित स्वरूपाचे आडाखे बांधणे चुकीचे ठरेल असे मला वाटते. कारण भिन्न जमाती, भिन्न व्यवसाय, भिन्न स्वभाव, भिन्न भाषा, भिन्न देव-देवता, भिन्न चालीरीती, भिन्न अन्नसवयी आणि अस्थिर व विस्कळीतपणामुळे स्थिर असलेल्यांशी भिन्न सामाजिक नाते असल्याने त्या त्या जमातीचे स्वतंत्र संशोधनसाहित्य निर्माण होण्याची निकडीची गरज मात्र हे पुस्तक स्पष्ट करते.

पुस्तकावर लेखक म्हणून संशोधकाचे नाव छापलेले असते. ते योग्यही आहे. पण ते एकट्या लेखकाचेच नसते. संशोधनासाठी संधी-साधने उपलब्ध करून देणारे, सल्ला देण्यापासून मार्गदर्शन करण्याचे सहकार्य करणारे, पाठिंबा-प्रोत्साहन देणारे हे सारेही काही प्रमाणात कारणीभूत असतातच. स्वतः संशोधक जर त्या मागास जमातीपैकी, गरीब कुटुंबात सोसले-भोगलेल्यांपैकी असेल तर भोवतीच्या जाणकार व समर्थक लोकांची जबाबदारी व महत्त्व अजून वाढते. कारण त्यांच्या वस्त्या अस्थिर व विस्कळीत असल्याने संशोधकांना श्रम, वेळ व पैसा जादा खर्च करावा लागतो. त्यांना ती साधने उपलब्ध करून देणे गरजेचे असते. वैयक्तिक आत्मकथने व ललित साहित्याच्या बरोबरीने, समलक्षणे असलेल्या वंचित घटकांच्या विकासाची वाटचाल स्पष्ट करणाऱ्या वास्तववादी संशोधनसाहित्याची (व्यक्तीऐवजी त्या त्या समाजघटकांच्या आत्मकथनांच्या संशोधनसाहित्याची) निर्मिती होण्यास भटक्या विमुक्त जमातींच्या क्षेत्रात खूप मोठा वाव आहे.

मुंबई विद्यापीठातील इतिहास विभागाचे प्रा. डॉ. नारायण भोसले यांनी या पुस्तकास सात पानी दीर्घ व अभ्यासू प्रस्तावना लिहिली आहे. त्यांच्या मते या पुस्तकामुळे भटक्या विमुक्तांच्या साहित्य क्षेत्रात एका वस्तुनिष्ठ अभ्यासग्रंथाची भर पडणार आहे, ज्यामुळे भटक्या विमुक्तांच्या बाबतीतले विपरीत आणि विषम समाजवास्तव समजण्यास मदत होणार आहे. भारतातल्या अनेक जाती-जमातींच्या उत्पत्तीसंबंधी दंतकथांची रेलचेल आहे. या दंतकथांच्या धुक्यात आजचे समाजवास्तव शोधणे म्हणजे अंधारातील काळे मांजर शोधणे होय. प्रबोधन चळवळ उभारणाऱ्यांनी या दंतकथांतील नायकांना आपला 'हीरो' संबोधून अस्मिताकेंद्री चळवळी उभारल्याही; पण या चळवळी समग्र समाजवास्तव बदलण्यासाठी उपयोगी पडलेल्या दिसत नाहीत. विनायक लष्कर यांनी अशा दंतकथांना किंवा मिथ्य धारणांना आपल्या संशोधनाचा विषय बनविला नाही हे एका अर्थी बरेच झाले आहे.

विनायक लष्कर यांनी आपल्या पुस्तकातील पहिल्या प्रकरणात संशोधनाची प्रस्तावना, प्रस्तुत संशोधनाचे पद्धतिशास्त्र, संशोधनाची सैद्धांतिक चौकट, वडारांचा इतिहास आणि संशोधन आराखडा दिला आहे. काही ज्येष्ठ समाजशास्त्रज्ञ व महाराष्ट्रातील अलीकडचे अभ्यासक-लेखक यांचे दाखले देऊन वडार समाज मूळ आंध्र प्रदेशातला असून तो प्रामुख्याने भारतातल्या तेरा राज्यांत विखुरलेला असून तो वेगवेगळ्या प्रदेशानुसार व अंगीकारलेल्या व्यावसायिक कामानुसार माती वडार, गाडी वडार, पाथरवट, ओड्ड, वड्डा, बेलदार, ओड्डे वडार, वडार, ओर्ह, वड्डु, भोवी, भोयर, नाईक, भांजा मेडी, मनू, कलू अशा वेगवेगळ्या नावांनी ओळखला जातो. यांच्यात पुन्हा वेगळ्या शाखा व पोटजाती निर्माण झाल्या असल्याचे, त्यांच्या चालीरीतींसह विस्ताराने लिहिले आहे. हा समाज मुळात माती खोदणे-वाहणे, दगड फोडणे-घडविणे-वाहणे या कामाशी व बांधकाम व्यवसायाशी संबंधित आहे. हा समाज विदेशांतसुद्धा विखुरलेला असून जपानमध्ये 'ओडा', श्रीलंकेमध्ये 'वड्डाज', अमेरिकेत 'रेड इंडियन्स', वेस्ट इंडीज व आफ्रिकेमध्ये 'ओडिओ' किंवा ओडम्बो' या नावाने ओळखला जातो अशी माहिती दिली आहे.

दुसऱ्या प्रकरणात लेखकाने वडार समाजावर तथा भटक्या विमुक्त जमाती या समाजघटकावर लिहिलेल्या सर्व लेखकांच्या साहित्याचा, आत्मचरित्रपर लिखाणांचा तसेच मासिके व नियतकालिकांतून आलेल्या लेखांचासुद्धा थोडक्यात व महत्त्वाचा आढावा अशा खुबीने घेतला आहे की चोखंदळ वाचकाला ते मूळ वाङ्मय वाचण्याची ओढ लागावी. सर्व साहित्याचा परामर्श घेतल्यानंतर हे स्पष्ट होते, की वडार समाजात शिक्षणाचे प्रमाण फार कमी आहे. अविकसित स्वरूपात ते जीवन जगत आहेत. उदरनिर्वाहाचा प्रश्न बिकट आहे. त्यासाठी पर्याय शोधण्याचे प्रयत्न होताना दिसत नाहीत, या निष्कर्षापर्यंत येऊन, उदारीकरण व जागतिकीकरणाच्या या युगात देश महासत्ता होण्याचे स्वप्न पाहत आहे. परंतु ज्यांना स्वप्नच पाहता येत नाहीत अशा वडार समाजाच्या कष्टप्रद जीवनाविषयी कोणी एक अक्षरही बोलताना दिसत नाही, अशी खंत लेखकाने व्यक्त केली आहे.

तिसरे व चौथे प्रकरण मात्र लेखकाने स्वतः केलेल्या पाहणी

व तपासणीवर आधारित आहे. बाहेरून आलेल्या वडार समाजाची पुणे शहर परिसरात सामावण्याची प्रक्रिया होत असताना कोणकोणत्या गोष्टी परिणामकारक ठरल्या याची सविस्तर उकल करण्याचा प्रयत्न या प्रकरणात लेखकाने केला आहे. कोणत्याही स्थलांतरित एकजिनसी किंवा वांशिक समूहाला नागरी भागात सामावले जात असताना त्याला सर्वप्रथम सामाजिक सुरक्षिततेची खात्री पटली पाहिजे. या खात्रीची भावना सामाजिक-आर्थिक आणि सामाजिक-सांस्कृतिक साधर्म्य असलेल्या घटकांकडूनच मिळते. म्हणूनच या विषयावर या प्रकरणात संशोधनावर आधारित विस्ताराने लिहिलेले आहे. संशोधनासाठी मुख्यत: आजच्या पुणे शहरातील आजची वडारवाडी निवडली आहे. संशोधनाच्या पहिल्या टप्प्यातच हे स्पष्ट झाले आहे, की वडारवाडीचा हा भाग सुरुवातीच्या काळात पुण्याबाहेर दूर असलेली डुक्करवाडी म्हणून ओळखला जायचा. कारण झुडपांचे जंगल असलेल्या पडीक जागेत डुकरांना जगण्यासाठी आवश्यक ती सोय तिथे होती आणि डुकरांचे मालक असलेल्या रामोशी, पारधी आणि वैदू जमातीच्या लोकांची वस्ती शेजारीच होती. ही वाडी इतर वाड्यांप्रमाणे तिथे राहणाऱ्या लोकांच्या किंवा त्यांच्या जाती/जमातीच्या नावे ओळखली जाण्यापेक्षा त्यांच्या जनावराच्या (डुकरांच्या) नावे ओळखली जात असे, यावरून त्या वेळची सामाजिकता आणि या जमातींच्या वाट्याला येणारे नाकारलेपण स्पष्ट होते. परंपरेने या लोकांचा पालनकर्ता असलेला वेताळबाबा पण शेजारच्या टेकडीवरच्या मंदिरात होता. त्यामुळे त्या टेकडीला वेताळ टेकडी असे म्हणायचे. साधारणपणे एक-दीड किलोमीटरवर जंगलात असलेल्या चतु:श्रुंगी देवीला सोडून शेजारीपाजारी दुसरा देव नव्हता. ज्या जागेवर यांनी झोपड्या टाकल्या ती जागा कोणाच्या मालकीची आहे हेही त्यांना माहीत नव्हते. सूर्यास्तापूर्वीच सारी कामे व जेवणे आटोपून, झोपडीचे दार घट्ट लावून लोक झोपायचे. भोवतीच्या जंगलामुळे जशी साप-विंचू-चोरांची भीती होती तशीच, किंबहुना त्यापेक्षा जास्त भीती त्यांना भुताखेतांची होती. या माहितीवरून त्यांची त्या वेळची सामाजिक, शैक्षणिक, वैचारिक व आर्थिक मागास स्थितीचे दर्शन होते.

पुणे-मुंबई पहिल्या रेल्वेलाइनचे काम करण्यासाठी १९व्या शतकात वडारांची पहिली पिढी पुण्यात आली, १९४०ला दुसरी पिढी आणि १९६०ला तिसऱ्या पिढीचे कामानिमित्त आगमन होऊन वडार वस्ती वाढत गेली. १२ जुलै १९६१ रोजी मुठा नदीला आलेल्या महापुरामुळे खडकवासल्याचे धरण फुटून पुण्यातल्या सर्व जाती-धर्मांच्या असंख्य लोकांची घरे वाहून गेली. त्यामुळे बेघर झालेल्या इतर जाती-जमातींच्या लोकांकडूनसुद्धा वडारवाडीतल्या मोकळ्या व पडीक जागा व्यापल्या गेल्या. वडारवाडी आता दाटीवाटीची वस्ती बनली. पण या वस्तीचे एक खास वैशिष्ट्य राहिले. जातिव्यवस्थेच्या उतरंडीमधील कनिष्ठ समजल्या गेलेल्या परीट, न्हावी, धनगर, नवबौद्ध अशा जातींचे लोकच तिथे आले. नारायण पेठेसारख्या ब्राह्मण व उच्चवर्णीयांच्या पूरग्रस्त भागातील बेघर लोक मात्र पद्मावती व दत्तवाडीसारख्या पुण्याच्या परिघावरील क्षेत्रात एकवटले. जातिअंतर्गत आर्थिक वर्ग आणि जात भावना यांच्या संघर्षातून कनिष्ठ जातींच्या या वडारवाडीत झालेले सामाजिक, सांस्कृतिक बदल समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून समजून घेण्यात उत्कंठा वाढते. भोवतीच्या बाह्य समाजात वडार लोक हे व्यसनी, गुन्हेगार व अनैतिक असतात, अशी पूर्वग्रहदूषित भावना असल्याने कष्टाळू व प्रामाणिक लोकांची होणारी कुचंबणा व त्यांच्या विकासकार्यात येणारे अडसर पण या पुस्तकातून स्पष्ट होतात.

सामान्यपणे भारतीय समाजरचनेत स्त्रियांची जीवनपद्धती चूल आणि मूल या रूढिवादी दृष्टिकोनात अडकलेली आहे, त्यास वडारवाडी अपवाद नाही. परंतु त्या जबाबदारीसह वडार जमातीच्या 'दगड-माती व बांधकामाच्या' परंपरागत व्यवसायात पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून कष्टाची कामे करण्याची जबाबदारीही महिलांवर परंपरेने टाकलेली आहे. समाजोपयोगी बांधकाम कौशल्यांबरोबर रोजच्या घरगुती गरजा भागविणारी, पाटा-वरवंटा, उखळ, जाते, खलबत्ता इत्यादींसारख्या दगडी वस्तू बनविण्याची कौशल्ये यांच्याकडे असल्यामुळे पूर्वी जमातिबाह्य समाजाशी यांचा सुसंवाद व व्यवहारी संबंध होता. उपजीविकेचे मर्यादित का असेना पण हुकमी साधन होते. विज्ञान, तंत्रज्ञान विकसित झालेल्या आधुनिक काळात परंपरेने सोपवलेली ही जबाबदारी पार पाडत वडारवाडीतल्या महिला शहरातल्या मध्यमवर्गीयांच्या घरांत धुणी-भांडी-स्वयंपाक-मूल सांभाळणे यांसारखी घरगुती कामे करण्यात कशा गुंतल्या; घराबाहेर कष्ट करण्यापेक्षा महिला घरातच राहण्यात प्रतिष्ठा आहे आणि पुरुषांच्या जिवावर ऐतखाऊ बनण्यात जास्त प्रतिष्ठा आहे, या ब्राह्मण्यवादी विचाराने काही ठेकेदार बनलेल्या पुरुषांची कुटुंबे प्रभावित होऊन त्यांच्या महिलांना बंगल्याच्या संरक्षक भिंतींच्या मर्यादा कशा पडल्या; शिवाय तिसऱ्याच पिढीतील काही महिला शिक्षण घेऊ शकल्याने प्राथमिक शिक्षिका, क्लार्क, अंगणवाडी सेविका कशा बनल्या, काही मोजक्याच महिला डॉक्टर व पत्रकार कशा बनल्या तेही स्पष्ट झाले. एकीकडे हे बदल होत असताना, कमजोर झालेला का असेना पण जातीचा परंपरागत व्यवसायच जातीच्या लोकांनी केला पाहिजे अशी धारणा व्यक्त करणारे; आम्हाला उपयोगी पडणारे शिक्षण घेण्यासाठी आमच्याजवळ पैसा नाही आणि आम्हाला जे शिक्षण मिळते ते आमच्या उपयोगाचे नाही, म्हणून शिक्षण घेण्यात आयुष्य बरबाद करण्यापेक्षा परंपरागत व्यवसायच करतो, अशी प्रातिनिधिक मते व्यक्त करणारे लोक आज विद्येचे माहेरघर असलेल्या पुणे शहरातल्या वडारवाडीत मोठ्या संख्येने आहेत



- वडार समाज : समाजशास्त्रीय अभ्यास
- विनायक लष्कर
- हरिती पब्लिकेशन्स
- पृष्ठे : १४४
- मूल्य : १५० रु.

हे वाचून विकासकार्यापुढची आव्हाने स्पष्ट होतात.

या समाजशास्त्रीय अभ्यासातून वडारवाडीतल्या वडार स्त्रियांचे जे सामाजिक मागासलेपण समोर येते ते वाचून धक्काच बसतो. वडारवाडीतील बरेच वडार पुरुष पान, विडी, तंबाखू आणि दारू इत्यादी व्यसनांच्या आहारी गेलेले आहेत. ते घरखर्चासाठी पैसे देत नाहीत. स्त्रिया स्वत: कष्ट करून स्वत: कमावलेल्या पैशांतून घरखर्च करतात. स्वत:च्या हौसेसाठी महिला पैसा खर्च करीत नाहीत. त्या नवऱ्याकडून एकच अपेक्षा करतात, की त्याने आपल्या व्यसनासाठी घरी पैसा मागू नये. वडारवाडीत वडार समाजात स्त्रियांचा होणारा शारीरिक छळ ही नित्याची व सामान्य बाब होऊन गेली आहे. नवऱ्याकडून होणाऱ्या शारीरिक छळाला प्रतिकार केला जात नाही. कारण तसे करणे किंवा कोणत्याही बाबतीत नवऱ्याला जाब विचारणे चांगल्या स्त्रीचे लक्षण नव्हे, अशी त्यांची परंपरेने चालत आलेली मनोधारणा आहे. एखाद्या घरात नवऱ्याने बायकोला मारले नाही तर त्याच्या पुरुषत्वाची थट्टा केली जाते. 'तो नवरा कसला जो बायकोला मारत नाही?' असा प्रश्न महिलांत चर्चिला जातो. नवऱ्याचे मारणे म्हणजे त्याने बायकोवर हक्क गाजविणे, प्रेम करणे असे समजले जाते. याचा अर्थ असा, की चूल व मूल सांभाळून, स्वत:ची हौस-मौज मारून, स्वत:च्या कष्टांच्या कमाईतून घरखर्च करून, नवऱ्याची लहर व मर्जी सांभाळूनसुद्धा स्त्री-धर्माच्या नावाखाली तिला अन्याय-अत्याचारास बळी पडावे लागते. विनायक लष्कर यांच्या या समाजशास्त्रीय अभ्यासाने स्वातंत्र्यप्रेमी समाजसुधारकांपुढे आव्हान उभे केले आहे, की वडारवाडीतील वडार महिलांच्या या अवस्थेला परिस्थितिशरण पराभूत मानसिकता, स्त्रियांची मानसिक गुलामगिरी की पुरुषप्रधान व्यवस्थेचे मतलबी वर्चस्व म्हणायचे? की आणखी काही? आणि ती अवस्था कशी सुधारायची? असे म्हटले गेले आहे आणि आपण तसे मानतो, की कुटुंबाची किंवा समाजाची प्रगती त्या कुटुंबातल्या किंवा त्या समाजातल्या महिलांच्या प्रगतीवरून ओळखली जाते. पुणे वडारवाडीतील वडार स्त्रियांबरोबर साऱ्या महाराष्ट्रातील केवळ वडार जमातीच्या महिलांच्याच नव्हे तर इतर तत्सम दुर्लक्षित भटक्या जमातींतील महिलांच्या जमातीअंतर्गत होणाऱ्या मुस्कटदाबी व असलेल्या पारतंत्र्याबद्दलसुद्धा शोध घेणे व त्यावर उपाय करण्यासाठी समाज व शासनाची संवेदनशीलता जागविण्याचा प्रयत्न लष्करांच्या या समाजशास्त्रीय अभ्यासातून झाला आहे.

शैक्षणिक विकासासंबंधात हा अभ्यास सांगतो, की भटक्या व विमुक्त जमातींत सातवीपर्यंतची गळती ४०% आहे. ७वी ते १०वीचे गळतीचे प्रमाण इतर सामान्य लोकांच्यापेक्षा तिपटीने जास्त आहे. (भ.वि. ६४.५२% आणि सामान्य लोक २२.२३%). भटक्या विमुक्तांच्या शिक्षणासंदर्भातले हे विदारक चित्र आहे. आखलेल्या शैक्षणिक विकासाच्या शासकीय योजना खूप चांगल्या परंतु अंमलबजावणी तेवढ्याच निष्काळजीपणाची. त्यामुळे चांगल्या योजना अयशस्वी ठरल्याचा ठपका या अभ्यासातून अप्रत्यक्षपणे ठेवला गेला आहे. अंगणवाडीतली सारी मुले आपसात वडारी बोलीभाषेतच बोलत असल्यामुळे ती भाषा न येणाऱ्या शिक्षिकेची मुलांना समजून घेण्यात होणारी कुचंबणा व त्यामुळे मुला-मुलींवर सहज, सुलभ व योग्य प्रकारे संस्कार होण्यातल्या अडचणींची आपण कल्पना करू शकतो.

प्रकरण चारमध्ये वडार जमातीचे लोक पुण्यातील नागरी समुदायाच्या जवळ राहूनसुद्धा स्वत:ची अलिप्तता कशी जोपासतात हे दाखविण्यात आले आहे. पुण्यात वेळोवेळी स्थलांतरित झालेला वडार समाज वेगवेगळ्या ठिकाणी वसला असला तरी समाजात कनिष्ठ समजल्या गेलेल्या जातींच्या वस्त्यांशेजारीच त्यांच्या वस्त्या निर्माण झाल्या असल्याचे अभ्यासात स्पष्ट झाले आहे. वस्त्यांतून एकत्र राहिल्यामुळे त्यांची छोट्या प्रमाणात का असेना पण गठ्ठा मते तयार झाली. त्यामुळे पुण्यात स्थलांतरित झाल्यापासून त्यांचा स्थानिक राजकारणात सहभाग आहे. जात, भाषा आणि धर्म यांमुळे वडार जमातीमध्ये सामूहिक एकात्मकता टिकून राहिल्याचे दिसते. सांस्कृतीकरणाच्या प्रक्रियेमध्ये ब्राह्मणीकरण, क्षत्रियीकरण व वैश्यीकरण या तिन्ही प्रक्रिया अभिप्रेत आहेत. वडार समाज क्षत्रियीकरणाच्या मार्गाने जात असल्याचे दिसते. वडार समाजातील ९०% लोकांनी जातिबाह्य व्यक्तींशी मैत्री करायला हरकत नाही असे मत व्यक्त केले असले, तरी ९५% लोकांनी उत्स्फूर्तपणे असे मत नोंदवले आहे, की आपण आपल्या समाजाच्याच लोकांच्या बरोबरीने राहायला हवे. म्हणूनच इतर समाजांशी सामाजिक संबंध जोपासण्याची प्रक्रिया होत असतानाच आपला मूळचा समूह आणि आपल्या मूळच्या समूहाची सांस्कृतिक वैशिष्ट्ये जतन करण्याचा प्रयत्न पुण्यातल्या वडार समाजाने केला आहे, हे या अभ्यासातून स्पष्ट झाले आहे.

प्रकरण पाचमध्ये सारांश, हाती आलेले काही निष्कर्ष आणि उपाययोजनांच्या सूचनांची नोंद केली आहे. पहिल्या

पिढीपासून तिसऱ्या पिढीपर्यंतच्या शिक्षणाचा आढावा घेता असे लक्षात येते, की वडार समाजात शिक्षण घेण्याविषयीची आवड वरच्यावर वाढत आहे. परंपरेनुसार वडारांच्या पोटजातींमध्ये भेदाभेद न करता युवक-युवतींची लग्ने जमवली पाहिजेत, आपण सारे एक आहोत, असा प्रचार काही शिक्षित वर्ग करताना दिसत आहे. जमातीतल्या लोकांमध्ये बौद्ध धर्माच्या तत्त्वज्ञानाविषयी फारसे सकारात्मक मत आढळत नाही. क्षत्रियांना सामावून घेणारा हिंदू धर्म सर्वांत श्रेष्ठ आहे, असे सांगणारे लोक वडार जमातीत बहुसंख्य आहेत. इतर धर्मातल्या वडारांपेक्षा आम्ही श्रेष्ठ आहोत, असेही त्यांना वाटते. जातीय अस्मिता टिकविण्यासाठी संघटनात्मक व संस्थात्मक पातळीवर लोकपाठिंब्याचे अनेक वेळा प्रमुख प्रयत्न झाले आहेत. सत्तेच्या राजकारणात व आर्थिक विकासप्रक्रियेत वडार समाजाचा सहभाग हळूहळू वाढत असला, तरी हा समाजशास्त्रीय अभ्यास असे दर्शवितो, की विकासाच्या रेल्वेगाडीला वडार समाजाचा डबा मागे जोडला गेला आहे; परंतु तो गाडीबरोबर धावत असला तरी तो मागचा डबा मागेच आहे. लोकशाहीला अभिप्रेत असलेल्या 'स्पर्धेतून विकास' या तत्त्वाचा क्षमतेनुसार लाभ घेऊ शकत नाही.

आपल्या या पुस्तकात विनायक लष्कर यांनी मॅक्स वेबरच्या संशोधनाचा दाखला देऊन 'जमात ही राजकीय कौशल्यानेच निर्माण केलेली बाब आहे' असे म्हटले आहे. हे फार महत्त्वाचे विधान आहे. जमातीचे जातीय स्वरूप आपल्या हिताच्या दृष्टीने कसे सांभाळता येईल याकडे सामाजिक धारणांचा रोख असतो. त्यासाठी धार्मिक विधी, कर्मकांड, जातविवाह, जातपंचायती या साऱ्या गोष्टी कायद्याच्या राज्यात चालूच ठेवल्या जातात. पूर्वापार चालत आलेल्या रूढी-परंपरा-अंधश्रद्धा पाळण्यासाठी विज्ञाननिष्ठ आधुनिक काळातही पुरेशी संधी उपलब्ध करून दिलेली असते. जसे वडार जमातीचे लोक क्षत्रियत्वावर दावा करतात तसे भारतातील ब्राह्मण वगळता बहुतेक सर्वच जाती क्षत्रियत्वावर दावा करतात. क्षत्रियत्वावर दावा करणाऱ्या या सुमारे ९५% लोकांचे, 'क्षत्रिय' वर्णाच्या नावावरसुद्धा कोणतेच ऐक्य होताना दिसत नाही आणि शोषणमुक्तीची चळवळ वर्णाच्या एकजुटीतूनसुद्धा उभारली जात नाही. प्रस्थापित, प्रभुत्वशाली आणि शासकवर्गाच्या भाषा, वेशभूषा आणि भोजनपद्धती शुद्ध व उच्च दर्जाच्या दाखवून शोषित जमातींना शासकवर्गाचे अनुकरण करण्याच्या शक्यता निर्माण केल्या जातात. म्हणून वडार समाजाला लागलेली क्षत्रियत्वाची ओढ म्हणजे ब्राह्मण्यवादाची ओढ होय. त्यामुळे स्वतःच्या जमातीत आणि शोषितांच्या एकजुटीत फूट पाडण्याचे ब्राह्मण्यवादाचे अंगभूत वैशिष्ट्य स्वीकारण्यापलीकडे काहीही साध्य होणार नाही. वडार समाजाचा संघटनात्मक व सामाजिक-राजकीय नेतृत्वाचा इतिहास काय सांगतो? वडार समाजात किमान राज्यस्तरावर भक्कम एकजूट नाही. त्यांच्या अनेक संघटना आहेत. आजपर्यंत समाजात समर्पित, निःस्पृह, त्यागी, विचारी असे अनेक कार्यकर्ते-नेते वडार समाजात होऊन गेले. आजही आहेत. परंतु वडार समाज सोडून इतर वंचित समाजाचा विचार व त्याबरोबर संपूर्ण राष्ट्राचा विचार करणारे नेते या ब्राह्मणी व्यवस्थेने निपजूच दिले नाहीत. कोणत्या तरी गॉडफादरचा भक्त तयार करण्यापलीकडे, वंचित घटकातून व्यापक समाजाचा स्वयंभू नेतानिर्मितीस ही ब्राह्मण्यवादी व्यवस्था विरोध करते. वंचितांतून व्यापक व प्रगल्भ समाजनेतृत्व निर्मितीची आणि संपूर्ण शोषितांच्या मुक्ती चळवळीची बांधिलकी मानणाऱ्या संशोधन साहित्याचा पाया या पुस्तकरूपाने विनायक लष्कर यांनी घातला आहे. ◆

बाळकृष्ण रेणके
चलभाष : ९४२२४५७४७१
◆
विनायक लष्कर
चलभाष : ८८०६८०६३६२



**भाषण**

**छाया महाजन**

# नव्या वेगवान जगात लेखकालाही वेग घ्यावा लागेल...



**मराठवाडा साहित्य परिषदेच्या सहाव्या मराठवाडा लेखिका संमेलनाचं अध्यक्षस्थान ज्येष्ठ लेखिका डॉ. छाया महाजन यांनी भूषवलं. अध्यक्षीय भाषणात त्यांनी साहित्यव्यवहाराच्या विविध अंगांना स्पर्श केला. या भाषणाचा संपादित भाग इथे प्रसिद्ध करत आहोत.**

स्त्रि यांचे लेखन हे वेगळे आहे, कारण मुळात स्त्री-पुरुषीय भावनिक, मानसिक विश्वातल्या अनेक घडामोडी, प्रक्रिया, प्रतिक्रिया आणि निष्कर्षही वेगवेगळे आहेत. सांस्कृतिक परंपरा, वेगळी कार्यक्षेत्रे, वेगळ्या शारीरिक क्षमता यामुळे वेगळी मानसिक पार्श्वभूमी, भावनिक पर्यावरण व वैचारिक सक्षमता यामुळे हे वेगळेपण अटळ आहे. याची कारणे सामाजिक संरचना, धार्मिक, सांस्कृतिक, मुख्यत: राजकीय पर्यावरणात्मक आणि ठाम गृहितांवर आधारित आहेत. याविषयी अनेक चर्चासत्रांत बोलले गेलेले आहेच.

ज्या क्षणी स्त्रीला दुय्यम दर्जाचा, आई किंवा पत्नीसारख्या बंधनांचा, संयमित स्वातंत्र्याचा, निर्णयप्रक्रियेत नसण्याचा, नीतिमूल्यांच्या घडणीचे शिल्पकार नसण्याचा आणि अनेक मर्यादांचा बोध झाला तेव्हा आत्मभान येऊन ती तिच्या असण्याचा, अस्तित्वाचा शोध घ्यायला निघाली. आता तर यापलीकडे जाऊन माणूस म्हणून मी कशी, किंबहुना मी माणूसपणाच्या किती जवळ समजली जातेय हे जाणायला ती उत्सुक झालीय. मग अनेक वाटा तिच्यासमोर उलगडू लागल्या. अनेक कार्यक्षेत्रे खुणावू लागली. त्यात अभिव्यक्तीची वाट होती- लिखाण.

मी लिहितेय हे खरे आहे, पण इतरांचे काय? ज्या माझ्या सहलेखिका आहेत त्यांचे विचार काय आहेत? त्या काय लिहितायत? त्या कशा, कुठे, कोणत्या आकृतिबंधातून अन् वैचारिकतेच्या पातळीवरून व्यक्त होताहेत?- या प्रश्नांची जाणीव झाली तेव्हा संवादाची गरज तीव्र झाली. तो प्रश्न या संमेलनाच्या माध्यमातून मसापच्या अध्यक्षांनी सोडवला म्हणून आज आपण इथे आहोत.

**भाषा :**

साहित्याची भाषा अंत:प्रेरणेची भाषा आहे. भाषेसंबंधी बोलताना- लहानशी कोवळी बोटं जाणत्या बोटाला पकडतात तेव्हापासूनची रुजलेली, स्वत:बरोबर वाढलेली आपली भाषा असते. जिच्याबरोबर मी वाढले त्या भाषेशी माझे भावनिक विश्व जोडलेले असते. म्हणून ती मातृस्वरूप असते. अनादिकाळापासून जिचा हुंकार प्राणिमात्रांत आहे त्या नेणिवेला आकार देणारी भाषा असते. तिला इतर भाषाही भेटतात. त्या मैत्रिणीसारख्या होतात. पण ती भाषा माझी नव्हे- मी नव्हे. ज्या भाषेबरोबर मी वाढले ती भाषा माझ्या भोवतालच्या पर्यावरणातून सामाजिक, धार्मिक, राजकीय आणि इतर किती तरी सांस्कृतिक गुंतागुंतीचे संदर्भ घेऊन तयार झालेली असते. ती एक संस्कार आहे. नात्यांची जाळी, जीवनातली सुखं आणि कष्ट, दु:ख, हालअपेष्टा, वंचना, अपमान, छळ, अन्याय, शोषण याने तयार झालेली नंतर ती प्रौढा असते. ती आंतरिक जीवनाचे वाहन आहे.

आपली भाषा आपल्या प्रांताला, देशाला बांधून ठेवणारी नाळ आहे. आपली मने तिच्याशी जुळलेली असतात. भाषा ही संस्कार व संस्कृतीशी बांधून ठेवणारी आहे. मराठी भाषेचे मराठीपण नष्ट न होता तिचे सांस्कृतिक संचित टिकायला हवे, तरच साहित्य टिकेल.







मी इंग्रजीत डॉक्टरेट केले. परदेशात सलग वास्तव्य केले. खूप वाचनही केले. पण इंग्रजीत लिहावे असे काही मला वाटले नाही. अनेकांनी मी इंग्रजीत का लिहीत नाही असे अनेकदा विचारलेही. पण माझ्या अंत:स्थातून ती भाषा उमलली नाही. म्हणून ती भाषा वाईट आहे असे नाही. ती अतिशय समृद्ध भाषा आहे. तिचा आदर्श आपण समोर ठेवला पाहिजे. या मितीला मराठीच नव्हे तर सगळ्या भारतीय भाषांच्या समोर इंग्रजी ही प्रश्नरूपाने उभी आहे. तिला शत्रूसारखे मानले जाते. पण इंग्रजी भाषा भारतासाठी परकी आहे, असे म्हटल्यावर अँग्लो-इंडियन लेखक अॅलन सिली याने जोरदार प्रतिकार केला होता. त्याची दखल घ्यायला पाहिजे. कारण मग अँग्लो-इंडियन समुदायच नाकारला जातो.

**लोकभाषा :**

भाषातज्ज्ञ गणेश देवींच्या मतानुसार १९६१च्या अहवालानुसार भारतात एक हजार सहाशे बावन्न भाषा बोलल्या जात होत्या, पण संविधानाने २२ भाषांना मान्यता दिली. मग उरलेल्या १६३० भाषांचे काय झाले? त्या नाकारल्या गेल्या.

त्यात आदिवासी, भटक्यांच्या भाषा आहेत. यामध्ये पर्यावरणाविषयी भरपूर ज्ञानाचा मोठा साठा आहे; जंगल, वनस्पती, प्राणी, पक्षी यांची माहिती आहे. ती माहिती त्यांच्या लोकभाषेत आहे. उदा. हिमालयातील आदिवासींना हिमनग वितळण्याचे ज्ञान असते, किंवा अंदमानातील आदिवासींना त्सुनामी येण्याची सूचना आधी कळते.

लोकभाषेमधून जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन आणि अस्तित्वासाठी झगडून मिळवलेल्या जाणिवा आहेत हे लक्षात घेतले पाहिजे.

असे म्हणतात, की दहा हजार वर्षांपूर्वी भाषांच्या मृत्यूचा झंझावात आला होता. त्यानंतर २१ हजार नव्या भाषा जन्मल्या. त्यातल्या दोन हजार शिल्लक आहेत. भाषा हे गृहीत तत्त्व नसून ज्ञान, संस्कार आणि साहित्य यांचे माध्यम आहे. त्याची व्याप्ती, विविधता, व्यवहार, परंपरा व गरजा हे समजावून घेतले पाहिजे. आपले बहुभाषिकत्व बहुसांस्कृतिकतेचे कारण व द्योतक आहे. एका भाषेचे वर्चस्व किंवा आधिपत्य जगात कुठेही नव्हते व नाही. साहित्यात आलेली अनेक मिथके ही विविध भाषांतून व समाजांतून आलेली आहेत. हे सांस्कृतिक मूल्य विसरता कामा नये.

शेवटी तुकाराम महाराज भाषेबद्दल म्हणतात ती ओवी लक्षात ठेवली पाहिजे.

शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वाहूं धन जनलोकां।।  
तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव । शब्दचि गौरव पूजा करूं।।

**'मराठी'ची सद्य:स्थिती :**

'घोडं तिरळं, वर बसलंय आंधळं ' ही मराठी भाषेची स्थिती आहे. नवीन मराठी शाळा चालू न करण्याचा निर्णय हा अन्यायकारक आहे, कारण भाषेच्या नाळेवरच तो आघात आहे. पण या निर्णयाविरोधात किती मराठी भाषक चळवळ करून उठले? किती आंदोलने झाली? थोड्याशा कोलाहलाने बदल घडत नाहीत. मुळातच इंग्रजीकडे कल. अशा शाळांत लाखो रुपये खर्चून प्रवेश देण्याची शर्यत लागली आहे. प्ले ग्रुपला घालण्यासाठी रात्रीपासून पालक रांगा लावून बसतात, ही वस्तुस्थिती आहे. अशा वेळी कमी उत्पन्न गटाच्या माणसांच्या कोंडमाऱ्याचा समाजाच्या मनात विचारही येत नाही. कारण 'हा समाज माझा आहे' ही भावना नष्ट झाल्यासारखी आहे. भाषा ही समाजबांधणीची साखळी आहे. तीच आपल्याला नकोय की काय?

**साहित्यनिर्मितीची प्रक्रिया :**

लेखकाचा लिहिण्यामागचा हेतू काय आणि निर्मिती कशी होते यासंबंधी अनेकदा विचारले जाते. याची वस्तुनिष्ठ उत्तरे असूच शकत नाहीत. लिहिण्याची इच्छा मनात ठेवून सर्जनशील लेखक लिहीत नाहीत. या घडणाऱ्या क्रियेची रासायनिक प्रक्रिया कोणीही देऊ शकलेले नाही. ही प्रक्रिया शक्य-अशक्यतेनेच सुरू होते वा संपते.

बऱ्याच वेळेस मनामध्ये नकळत नोंदी होतात. आपल्याला खूप अनुभव येतच असतात. त्यात धक्कादायक असतात तसेच अगदी क्षुल्लक व सामान्यही असतात. तरीही त्यातले काही मनात खोल कुठे तरी असतातच. त्यांना ठेवून घेतल्याची जाणीवही नसते. सुख-दु:खाचे, खेद-अपमानाचे, मान-सन्मानाचे, उदास-भकास होण्याचे, रोजच्या आयुष्यात भावभावनांना वेगळ्या पद्धतीने डिवचणारे, हाकारणारे अनुभव असतात. त्याबरोबर त्याच्या प्रतिक्रियाही मनात तयारच होत असतात. स्वानुभवाशिवाय मनाला चिरून टाकणाऱ्या, ग्रासून टाकणाऱ्या, उद्ध्वस्त करणाऱ्या घटना दिसतात. नव्याने उदयाला आलेला आतंकवाद, आतंकी संघटना, त्यातली तरुण मुले, त्यात होणारे खून, हत्या, बॉम्बस्फोट, निरपराधांच्या हत्या, रक्तपात, भ्रामक तत्त्वांसाठी ओलीस धरणे, शेतकऱ्यांची दैना याशिवाय स्त्रियांवरचे अत्याचार आणि बलात्कार यामुळे चीड आणि घृणेने मन उद्विग्न होते, पण असहायता आणि दौर्बल्यामुळे उदासी येते. असुरक्षिततेच्या भावनेबरोबर लाज दाटून येते. उजेडाच्या वाटेवर काळोखाचे डोंब उसळले की भ्रमित अवस्था होते आणि हे सगळे मनात साचत जाते. भ्रष्टाचार, शासनाचा ढिम्म योजनांचा भडिमार हे पाहून मन पिळून निघते. हे सगळे आणि आजूबाजूच्या माणसाच्या वृत्ती-प्रवृत्तींचे, स्वार्थाचे दर्प याने आपण जगतोच कसे, असे वाटते. पण हे सगळे मनात निश्चित साचते.

दु:ख, दया, लाचारी, करुणा, वेदना आणि भय हृदयाशी भिडते. दु:खाचा हुंकार साहित्यरूपाने येतो. कवितांमध्ये ही वेदना, ही कळ फार स्पष्ट रूपात येते. अशा स्वप्रेरणांशिवाय ज्या समाजात आपण राहतो, जगतो, वाढतो त्यांच्यासाठी ही आपली जबाबदारी असते. विविध चळवळींतून अन्यायाचे निवारण करण्याचा प्रयत्न चालूच असतो. बहुसंख्य लेखकांनी ही जबाबदारी सामाजिक बांधिलकी म्हणून खांद्यावर घेतली आहे. तीच त्यांची प्रेरणाही आहे. वास्तविक अशी सामाजिक बांधिलकी आपल्या आयुष्याचा भाग असते, पण ती धर्म म्हणून स्वीकारली



अनुक्रमणिका

की इतरांच्या आयुष्याचा विचार त्यात येतोच. इतरांची, विशेषत: जे बंडाचा किंवा प्रतिकाराचा आवाज विसरलेत किंवा त्यांचे आवाज दबून गेलेत, अशांची आयुष्ये सुधारावीत, योग्य दिशेने जावीत, समृद्ध व्हावीत, त्यांच्याकडे सहानुभूतीने पाहण्याची दृष्टी विकसित व्हावी ही बांधिलकी. दारिद्र्य, शोषण, अन्याय, दुर्लक्ष, उपेक्षेने पीडितांच्या वेदनेला, गळचेपीला, दबलेल्या श्वासांना मोकळीक देण्याची गरज निश्चित आहे. अशा प्रश्नांची मोठी जंत्री होईल. अशा वेळी व्यवस्थेला प्रश्न विचारणारा, त्यांचे ढोंग उघडे पाडणारा, त्यांना जागे करणारा आवश्यक असतोही. अशा हस्तक्षेपासाठी जीवनाबद्दल आस्था असणे अपरिहार्य आहे. मग तशी बांधिलकी वास्तवासह कल्पनेच्या बरोबरीने आली तर वास्तववादी वाङ्मय आपोआपच जन्म घेते; अन्यथा, ती एक कसरत होते, जाहीरनामा होतो. सामाजिकतेचा नुसता गवगवा होतो.

लिखाणामागची प्रेरणा काय, या साध्या प्रश्नाचं उत्तर जीवन आहे. जीवन हे माझं माझ्या भोवतीचं, पृथ्वी ते अवकाशापर्यंतचं आहे, पण स्काय इज द लिमिट नाही. त्याच्या पुढेही, परेही आहे. मन हे शरीरापेक्षा सूक्ष्म, वेगवान, चंचल आहे तोवर प्रेरणांची कमतरता नाही.

**चळवळी :**

मराठी साहित्यसमृद्धीला अनेक विचारप्रवाह कारणीभूत आहेत. यात मुख्यत: सामाजिक चळवळींचा भाग मोठा आहे. दलित चळवळीने एक मोठी देणगी मराठी साहित्याला दिली. ते आहे दलित साहित्य. या साहित्याने अन्यायाविरुद्ध आक्रोशाने इतर भाषांनाही हलवून जागे केले. इतर प्रांतांतही अशा पद्धतीचे लिखाण सुरू झाले, ही मोठी प्राप्ती आहे.

मार्क्सवाद, वास्तववाद, उत्तर वास्तववाद, वसाहतवाद, उत्तर वसाहतवाद, आधुनिक व उत्तर आधुनिक वादांसारखे अनेक वाद मराठीत आले. ते पाश्चिमात्यांचे देणे आहे. असे हजारो वाद इंग्रजी साहित्यात समीक्षकांनी संशोधित केले आहेत, पण राष्ट्रवाद, देशीवाद आणि फुले-आंबेडकर चळवळीतून आलेला परिवर्तनवाद हे चळवळीतून आलेले आपले आहेत. अर्थात याबाबतही मतांतर असू शकेल.

इथे आरंभ झालेली ग्रामीण साहित्य चळवळ ग्रामीण साहित्याला प्रतिष्ठा देणारी ठरली. या चळवळीमुळे ग्रामीण जीवनाच्या चित्रणाला अधिक वाव मिळाला.

**वर्तमान परिस्थिती :**

सामाजिक बांधिलकी हा शब्द चांगल्या अर्थाने तयार झाला आणि विकृत पद्धतीतही वापरला जाऊ लागला. साहित्यातही तो उचलला गेला आणि समूहाची जबाबदारीने घेतलेली भावना किंवा आलेली साहित्यिक प्रेरणा म्हणून स्थिरावला. गेल्या दोन-तीन दशकांत हीच काय ती खरी प्रेरणा आणि तोच एक शुद्ध परोपकारीय हेतू, असाही दावा मांडला जातोय. त्याचे समर्थन वा खंडन करण्याचे हे व्यासपीठ नाही. प्लेटो या तत्त्वज्ञाने 'माणसांपेक्षा राष्ट्रीयता किंवा प्रादेशिकता मोठी असते' या तत्त्वाची मांडणी केली होती. त्याला कवी वेडे वाटायचे आणि काल्पनिक साहित्य मूल्यहीन वाटायचे. तसे इतर साहित्यिक प्रेरणांच्या गदारोळात व्यक्तिनिष्ठ साहित्याचे होते की काय असे वाटू लागले आहे.

**वाचनसंस्कृती :**

सध्या माहितीपर साहित्य पुस्तकरूपात येत आहे. विविध क्षेत्रांतील, (उदा. आरोग्य, विज्ञान, कृषी, पर्यटन इ.) साहित्याची रेलचेल झालीय. यात वाङ्मयीन साहित्य अंग चोरून उभे आहे. वास्तविक आज जवळजवळ प्रत्येक जिल्ह्यात किंवा तालुक्यात कोणते तरी साहित्य संमेलन भरत असते किंवा निदान ग्रंथमहोत्सव, कविसंमेलने भरतच असतात. संमेलने-अक्षरयात्रांसारख्या चालत्या-फिरत्या साहित्य रथयात्रांत उत्तम ग्रंथविक्री होते असे तपशील येतात. त्यातून साहित्याची ओढ आहे असे वाटते, निकोप वाचनसंस्कृती पुनरुज्जीवित झाली आहे असे वाटते तोच वाचनसंस्कृतीचा ऱ्हास होत असल्याचा ओरडा होतो. चर्चासत्रे आयोजित केली जातात. साहित्याच्या वाचनातून येणारी प्रगल्भता, जीवनदृष्टी, जीवनानुभव यावर तळमळीने बोलले जाते. तरीही सर्जनशील साहित्य पिछाडीवर चालले आहे, हे सत्यही भगभगीतपणे पुढे येते. आजकाल प्रकाशकही कविता, कथा, कादंबरी वाचल्या जात नसल्याचे व्यापारीय पद्धतीने सांगतात.

एकूणच, वाङ्मयरुची-वाङ्मयदर्जाचे प्रश्न भेडसावताहेत. असेच चालू राहिले तर या परिस्थितीत वाङ्मयरुचीवर कसा परिणाम होईल यावरच चर्चा घेणे गरजेचे होईल. वाचनसंस्कृतीची घसरण हा महत्त्वाचा मुद्दा आहे. तसे एक गोष्ट एकदमच लक्षात घ्यायला पाहिजे, की मोबाइल व व्हॉट्सॲपवरील संदेश, कॉम्प्युटरवरचे ई-मेल यातून एक नवीनच लिखित भाषा तयार होते आहे. संक्षेपात दिलेले हे निरोपच फक्त भविष्यात वाचले जातील का, असा सध्या तरी प्रश्न आहे. त्यामुळे कथा-कादंबऱ्या, ललित, प्रवासवर्णने किंवा ऐतिहासिक, काल्पनिक वर्णनेही स्वप्नरंजनात्मक म्हणून बाजूला पडून 'टु द पॉइंट' (गरजेपुरते) एवढेच लिपीरूपात वाचले जाईल का?

एकूणच, वास्तववादाचा पगडा इतका जबरदस्त आहे, की कल्पनाशक्तीने लिहिलेल्या फँटसीज (अद्‌भुत कथा) किंवा तत्सम हॅरी पॉटरसारखे लिखाण वाचले जाऊ शकते की काय असे वाटते. एका लेखिकेने मला काळजीच्या स्वरात विचारले, की स्वप्नरंजन आणि कल्पनाविलास लोपच पावत चाललाय का? वास्तविक सध्या लिखाणात व सिनेमात प्राणिमात्रांना माणसाची भूमिका देऊन विज्ञान-तंत्रज्ञानाने कल्पनाशक्तीला मोठा वाव दिलेला आहे. परग्रहावरून येणारी अवकाशयाने आणि परग्रहप्रवासी यावरही भरपूर लिखाण लिहिले जात आहे. त्यामुळे भावनात्मक व ऐतिहासिक कल्पनांच्या झोताची दिशा या बाजूला झुकते आहे.

**ग्रामीण जीवन :**

विकासाच्या प्रक्रियेत आणि तांत्रिक विकासात शेतकऱ्यांपर्यंत पोहोचण्याचे ध्येय ठेवणारे आपण त्या शेतकऱ्याला शेतकरी राजापासून दरिद्रीनारायणापर्यंत आलेले पाहतो आहोत. कर्जाच्या ओझ्याखाली केलेल्या आत्महत्यांनी खिन्न होतोय. माणसाने

व्यवहारासाठी तयार केलेले चलन (पैसा) हे त्याच्याच मृत्यूचे कारण ठरते आहे. नागरी-ग्रामीण भेदांची दरी रुंदावतेय. मल्टिप्लेक्सेस झगमगताहेत आणि अजूनही झोपडीतला अंधार पणती मागतोय.

दलित, स्त्रिया व तृतीयपंथीय यांना माणूसपणाच्या कक्षेत आणण्याचे प्रयत्न आजही चालूच आहेत. सुशिक्षित होण्याचे स्वप्न देणारे आपण शिक्षण घेणे इतके महाग केले आहे की तो स्वप्नांच्याऐवजी ताणाचा विषय झालेला आहे.

ऋतूवरहुकूम परंपरागत चालत आलेले शेतीचे ठोकताळे बदलताहेत. हिमालयातील वनस्पती राजस्थानातल्या वाळवंटातल्या ग्रीन हाऊसमध्ये वाढत आहेत, तर आपल्याला टेस्टट्यूब बेबीचे वरदान वाटतेय. सरोगेट मदरची कल्पना भाड्याच्या घराइतकी साधी वाटायला लागली आहे. चंगळवादाने नीतितत्त्वांना, प्रस्थापित आचारांना बाहेर काढले. माणसांतल्या नात्यांचा आब राहिलेला नाही. हे सर्व पचवायला सोपे नाही. हजारो वर्षांची परंपरा मोडून-तोडून जातीच्या उतरंडींना चूड लागलेली असताना काही राजकारणी नेत्यांनी मात्र जातींचे पुनरुज्जीवन चालूच ठेवले आहे. शहरातून गेलेली जात ग्रामीण भागात ठाण मांडून बसलेली आहे. अत्यंत स्थिर असलेली विवाहसंस्था घटस्फोटांच्या घटनांनी हादरली आहे.

**नीतिमूल्यांची बांधणी :**

अबाधित वाटणाऱ्या विवाहसंस्थेच्या अस्थिरतेने सामाजिक परंपरेलाच धक्का बसतोय. स्त्री-पुरुष स्वतंत्र आयुष्य जगण्याची मनाजोगती पद्धत अवलंबताना दिसताहेत. विवाहाचे वय वाढणे, लग्नालाच नकार किंवा 'लिव्ह-इन रिलेशनशिप'ला मिळालेली प्राथमिकता या गोष्टी सर्रास चालू आहेत. पारंपरिक नीतिधर्म मोडीत निघतो आहे. नेमके हेच आव्हान साहित्यिकांपुढे आहे असे मला वाटते.

अनेक धार्मिक विधींमध्ये स्त्रियांसाठी अत्यंत कष्टकारक भाग होता. शिक्षण आणि स्त्रीमुक्ती यांच्या प्रभावाने यातून विविध मार्ग निघताहेत. स्त्री स्वत:साठीचे निर्णय घेत आहे. आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र होत आहे. सामाजिक जबाबदारी पेलते आहे. शुचितेच्या कल्पनांना धक्का बसतोय. स्त्रीचारित्र्याची पवित्रता समाजाकडून डागाळली जाते. तिला स्वच्छंद-बदफैली असा शिक्का दिला जातोय.

स्त्रीवादी साहित्याचा उगमही इतर इझम्ससारखा पाश्चात्य विचारधारेतून आलाय. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर मानवी हक्काच्या मागणीबरोबर स्त्री-पुरुष समानतेचा उद्‌गार निघाला. मताधिकार युरोपमध्ये जॉन स्टुअर्टने तर अमेरिकेत मार्गारेट बेंटने मागितला. तो मिळाला. ही चळवळ भारतात उभी राहायला साठोत्तरी वर्षे उजाडले. वास्तविक स्वातंत्र्याबरोबर भारतीय स्त्रीला मताधिकार आणि शिक्षणाची संधी उपलब्ध झाली. इतर कायदेशीर अधिकार आता मिळताहेत. पण शिक्षणाने आणि स्त्रीत्वाच्या आत्मभानाने तिला नव्याने स्वत:ची ओळख होतेय. इतिहासात अनेक प्रक्रियांमध्ये स्त्री दबली होती. अन्यायाचे स्वरूप पिढी दर पिढी बदलले तरी दुय्यमतेचा दर्जा तोच राहिला. आता याला आवाज लाभलाय.

स्त्रियांचे अनुभवाचे अंगण छोटे आहे; त्यांचे साहित्य कशाला वाचायचे, असा तुच्छतेचा सूर समीक्षक, वाचकांमध्ये आहेच. पण रिंगणातून अंगणात नुकत्याच आलेल्या, भूमिकांमध्येच गुंतवल्या गेलेल्या आणि उणीपुरी साठ वर्षांची परंपरा लाभलेल्या स्त्रीच्या मानसिक कोंडवाड्याचा दरवाजा आता उघडतोय, तोही शिक्षित पिढीकडून. त्यामुळे त्यावर मध्यमवर्गीय छाप आपोआपच बसते.

पण अशा परिस्थितीतून परदेशीय लेखिकांनाही जावे लागते आहे. 'माझ्यातल्या व्यक्तीबद्दल तुझ्यातल्या व्यक्तीला प्रेम हवं' असे म्हणणाऱ्या गौरी देशपांडे माणूसपणाच्या स्तरावर जाऊ इच्छितात. पण स्त्रीच्या आजूबाजूचे सांस्कृतिक पर्यावरण आणि वर्ग, जात, धर्म, जमातीच्या परिघात तिने काय सोसलंय, ती कशी वावरली, तिने प्रतिक्रिया-बंड कसे केले हे भारतीय स्त्रीच्या लिखाणात येणे साहजिकच आहे.

स्त्रीस्वातंत्र्याचा विचार करताना एक गल्लत होते ती 'स्त्री विरुद्ध पुरुष' अशी आहे, पण खरे तर ते तत्त्व 'स्त्रीविरुद्ध सत्ता' असे आहे. सत्ता मिळवणे आणि मिळविलेली टिकवणे ही माणसाची नैसर्गिक वृत्ती असली तरी तिच्यात 'अन्यायाखाली दवणारे' अशी असणारच. ती सत्ता महिलांकडेही कोणे एके काळी होती. नंतर ती पुरुषांकडे आली आणि त्यांनी सोयीने त्यात धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक बदल केले. ते नैसर्गिक होते म्हणून योग्य होतेच असे नाही. ही मानसिकता ठसली गेली. ती मानसिकता बदलण्याचा भाग आहे. आधीच्या काळात स्त्रियांची भूमिका सहन करण्याची आणि सामंजस्याचीच होती. म्हणून बहिणाबाई म्हणतात, 'स्त्रीचे शरीर, पराधीन देह'. यावर उपाय विरक्तीचाही नाही म्हणून सांगतात, तर 'वृक्षवल्ली'चे एकमेकांवर अवलंबून असणे अनेक संत सांगतात. पण जेव्हा अन्याय, शोषण, छळ, शारीरिक अत्याचार गुलामासारखे व्हायला लागतात तेव्हा बंड होते. ते स्त्रियांनी केले आहे. केलेल्या प्रत्येक अपरिमित कष्टांची, शरीरशोषणाची, मानसिक घुसमट-छळाची, गुरासारख्या दिल्या गेलेल्या वागणुकीची आठवण उफाळून व्यक्त होते आहे. अजूनही होतेय. आता त्याहीपेक्षा सखोल माणूसपणाचा आणि अस्तित्वाचा विचार साहित्यातून डोकावतोय आणि आपल्या क्रोमोसोम्समधल्या (गुणसूत्रातल्या) स्त्रीत्वाच्या शृंखलांचा नाश कसा करायचा, असा मूलभूत विचार सुरू झालाय.

**माझ्या मते :**

उदारीकरण, जागतिकीकरणाच्या सपाट्यात अनेक गोष्टींची उलथापालथ झालीये. यात देशोदेशींचे आर्थिक खुले व्यवहार जसे होतात तशी सांस्कृतिक देवाण-घेवाणही सुरू झालीये. पूर्वीही पु.ल., खांडेकर, कुसुमाग्रज- अगदी जी.ए. कुलकर्णींनाही भाषांतराचा मोह आवरला नाही. आता तर जगच एक खेडे, अशी कल्पना आहे. उत्सुकतेची व्याप्ती आता वाढलीये.

भाषांतर हे फार मोठे क्षेत्र लेखिकांसाठी खुले आहे. बव्हंश देशांतली पुस्तके ही इंग्रजीत असतात किंवा फ्रेंच, स्विस,

स्पॅनिशमधून ती इंग्रजीत येतात. तेव्हा ती योग्य निवडीद्वारा भाषांतरित होऊ शकतात. शिवाय आपल्याच देशात इतर प्रांतांतील पुस्तकांचाही अनुवाद होऊ शकतो. यात सोयीचा भाग असा आहे, की आपली सांस्कृतिक पार्श्वभूमी सारखी आहे. ग्रामीण भागांत साम्य आहे. राजकीय, सामाजिक, धार्मिक, पर्यावरणांत साधर्म्य आहे.

आंतरभाषिक देवाण-घेवाण साहित्य अकादमीसारखी संस्था करते आहे. तशाच पद्धतीने भाषांतरे करीत असलेल्या साहित्यिकांनी एकत्र येणे गरजेचे आहे.

आता मी जे सांगणार आहे त्यात कडवट समीक्षेचा भाग नाही तर डोळस निरीक्षण आहे. किती तरी विषय हाताळायचे राहून जाणे ही नैसर्गिक बाब असते शिवाय लेखन परंपरेचाही भाग असतो. शिवाय आपला कल, आवड, प्रवृत्तीही यात महत्त्वाची असते. पण किती तरी क्षेत्रे लेखिकांसाठी खुली आहेत. त्याचा गांभीर्याने त्यांनी विचार करावा असे वाटते.

माझी खंत समीक्षा संपत चालल्याची आहे. मराठीतले सगळे समीक्षक कुठे गेलेत? समीक्षा ही फक्त विद्यापीठीय स्तरावर आणि प्रबंध ठेवण्याच्या तळघरातल्या खोलीत बंद झालीये का? स्त्रीलेखनाची समीक्षा आग्रहाने न करणारेच जास्त आहेत. गुणवत्तेचा निकष लावून किंवा 'बायकी साहित्य' ही संभावना करून दुर्लक्ष झाल्याने लेखिकांच्या लेखनाला न्याय कसा मिळेल?

स्त्री म्हणून काही मर्यादा आपोआपच येतात हे मला माहिती आहे. व्यक्ती म्हणूनही आणि कौटुंबिकही. सामाजिक परिघाला सांभाळत स्वत:च्या चारित्र्याबद्दल वावगे बोलले जाऊ नये याची काळजी घेत लिखाण होते. यात बोल्ड किंवा सांस्कृतिक धक्का देण्याच्या बाबतीत आपण सावध असतो. व्यक्तिश: त्रास नको असतो. कारण आपल्याकडे लेखन आणि लेखकाचे आयुष्य हे वेगळे न मानण्याचे गृहीत धरले जाते. थोडक्यात, आत्मानुभव हा अंशत: प्रतिबिंबित होत असेलच; पण लिखाण हे आत्मचरित्र नव्हे, ही खूणगाठ वाचकांनी बांधणे आवश्यक आहे व हे भय लेखिकांनीही बाळगू नये. उलट, नुसते धक्कातंत्र न अवलंबिता त्यातून व्यापक जीवनजाणिवा आपण दाखविण्याचेच चिंतन ठेवावे.

स्त्रियांच्या संयमित अनुभवांच्या कक्षा आणि विषयाची व्यापकता कवेत घेण्याची असमर्थता, असाही आरोप असतो. त्याच्या खंडनाचे हे व्यासपीठ नाही, पण लेखिकांना वेगळे वागवण्यात येऊ नये असे मला प्रांजळपणे वाटते. लेखक हा माणूस असतो. लिंगभेद नैसर्गिक आहे, पण माणूसपणाची इतर गुणवैशिष्ट्ये ही एकच आहेत. वृत्ती, विकार, भावनाही त्याच आहेत. फक्त अनुभवांचे परिसर वेगळे आहेत. मग ज्याने त्याने आपापल्या परिसरातले व त्यापलीकडेही जाऊन लिहिलेले वेगळे कसे? तो फक्त दृष्टिकोनाचा वेगळेपणा असू शकतो. तेव्हा लेखिकांचे लिखाण हे मुख्य प्रवाहाचाच भाग म्हणून विचारात घ्यावे, हा माझा आग्रह आहे.

प्रत्येक लेखिका ही एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे. तिला तिचे वैचारिक धन आहे. तिने लिहिताना या स्वातंत्र्याचे भान ठेवणे आवश्यक आहे. मला स्वत:ला स्वातंत्र्याशी समायोजन करणे अजिबात पटत नाही.

फ्रान्सिस वॅटकिंग नावाच्या निग्रो कवयित्रीच्या खालील ओळी म्हणजे माझा आदर्श ग्रंथ आहे-

आय वॉंट नो मॉन्युमेंट प्राऊड अँड हाय
टु अरेस्ट द अटेन्शन ऑफ पासर बाय
ऑल माय यार्निंग स्पिरिट क्रेव्ह्ज
इज वरी मी नॉट इन द लँड ऑफ स्लेव्ह्ज

**वितरणाची वेगळी व्यवस्था :**

शाब्दिक दळणवळणातून कॉम्प्युटर उद्योगक्षेत्रात घुसले. आता तर थेट साहित्यातही. खिळे जोडून अक्षर जुळवणी करणाऱ्या प्रकाशकांना यांत्रिक छपाई ही नवी सोपी संधी मिळाली. जागतिक ई-बुक मार्केटच्या २०१३ च्या अहवालानुसार येत्या पाच वर्षांत ई-बुक्सचा ग्रंथव्यवहार १५ टक्क्यांनी वाढणार आहे. किंडल व नुकच्या वाचकांबरोबर टॅब्लेट, स्मार्ट फोन, आयपॅडवरही तरुण पिढी वाचते आहे. छापील पुस्तकांपेक्षा या पुस्तकांची किंमतही कमी आहे.

ई-बुकचे जगभरचे वाचक मराठी बोलणारे आणि लिहिता-वाचता येणारे आहेत. प्रकाशकाशिवाय किंवा छापील पानांशिवाय सरळ वाचकांपर्यंत पोचण्याचा हा सुलभ मार्ग आहे. प्रकाशित झालेली पुस्तकेही यातून जातात आणि अप्रकाशित पुस्तकेही. यासाठी हा स्वयं-प्रकाशनाचा मार्ग आहे. यासाठी विक्रेत्यांवर, प्रकाशकांवर अवलंबून राहण्याची गरज नाही.

**मोबाइल बुक :**

त्याचबरोबर आता त्याच स्वरूपात मोबाइल ई-बुक ही कल्पना रुजते आहे. काही परदेशी कंपन्यांनी हा व्यवसाय भारतातही सुरू केलाय. शिवाय 'एक पुस्तक, अनेक वितरक' असे याचे स्वरूप आहे. नव्या वेगवान जगात लेखकालाही वेग घ्यावा लागेल आणि आपली पुस्तके जास्तीत जास्त वाचकांपर्यंत पोचवावी लागतील.

शेवटचा उल्लेख असला तरी तोच मुख्य आहे. तो उल्लेख वाचकांचा आहे. कुठल्याही लेखकाला लिहिते ठेवायला रसिक वाचकच कारणीभूत आहेत. त्याची ऊर्जा, सर्जनशीलता यासाठी वाचकांचा प्रतिसाद अत्यंत महत्त्वाचा आहे. वाचकांच्या प्रतिक्रिया या लेखकाचा प्राणवायू आहे. डोळस वाचक हा एक मार्गदर्शकही असतो. काही वाचक वाचून प्रतिक्रिया कळविण्याच्या भानगडीत पडत नाहीत. पण त्यांना आवर्जून आवाहन करते, की सशक्त लेखक घडविण्याचे सामर्थ्य तुमच्यातच आहे हे जाणा आणि कृतिशील राहा.

आपण सगळेच ज्ञानाचे पुजारी आहोत. रसिकता आणि संवेदनशीलता वाचकांत असते आणि नीरक्षीरविवेकही. या सगळ्यासह जागरूक राहा. जागृत करा. ती मोठी साहित्यसेवा असेल.

◆

**डॉ. छाया महाजन**
चलभाष : ९८२३२५५९०२
drchhayamahajan@gmail.com



अनुक्रमणिका



निवडक नवे

# अस्वस्थ आणि अंतर्मुख करणाऱ्या कविता



**तीव्र एकांतातल्या जीर्ण काळोखात**
**मनोहर जाधव**
**ग्रंथाली, मुंबई**
**पृष्ठे : ११२**
**मूल्य : १२० रु.**

डॉ. मनोहर जाधव हे कवी, अनुवादक, समीक्षक आणि वक्ते म्हणून सर्वदूर परिचित आहेत. त्यांचे कवितासंग्रह, समीक्षासंग्रह आणि संपादन या स्वरूपातील एकूण तेरा ग्रंथ आजवर प्रकाशित झाले आहेत. या तेरा ग्रंथांमध्ये त्यांच्या तीन कवितासंग्रहांचा अंतर्भाव होतो. १. 'कधी कधी' (इ. स. १९९६), २. 'प्रत्ययपर्व' (इ. स. २०१०), ३. 'तीव्र एकांतातल्या जीर्ण काळोखात' (इ. स. २०१४) हे त्यांचे कवितासंग्रह होत.

डॉ. जाधव हे एक संवेदनशील कवी आहेत. आपल्या आजूबाजूला समाजामध्ये जे काही बरेवाईट घडत असते, त्या घडण्याकडे त्यांचे कविमन डोळसपणे बघत असते आणि त्या संदर्भातील आपल्या भावभावना ते कवितेतून थेटपणे शब्दबद्ध करीत असते. 'तीव्र एकांतातल्या जीर्ण काळोखात' या त्यांच्या तिसऱ्या आणि अगदी अलीकडील कवितासंग्रहामधून याचा प्रत्यय येतो. विशेषतः इ. स. १९९० नंतर जागतिकीकरणाच्या झंझावातामध्ये व्यक्तिजीवन कसे दिवसेंदिवस गुंतागुंतीचे होत चालले आहे, याचे अस्वस्थ करायला लावणारे चित्रण डॉ. जाधवांनी आपल्या अनेक कवितांमधून केले आहे. 'कोंडमारा' या पहिल्याच कवितेमध्ये डॉ. जाधव प्रारंभीच लिहून जातात,

*'कायमच कोंडमारा*
*मनासारखं लिहिता येत नाही*
*बोलता येत नाही, नुस्ताच बोजवारा*
*धड जगताही येत नाही मनासारखं'* (पृ.११)

वाट्याला आलेला हा कोंडमारा अधिकाधिक अस्वस्थ करतो. वाढत चाललेला गुंता सुटत नाही. म्हणून मग कवी 'झमेला' या कवितेच्या शेवटी हताशपणे पुढील उद्‌गार काढतो,

*'काय झमेला आहे हा काहीही कळत नाही'* (पृ.६५)

डॉ. जाधव पुरुषांकडे, स्त्रियांकडे आणि स्त्री-पुरुष संबंधांकडे नितळ नजरेने पाहतात. त्यामध्ये ते कोणताही आडपडदा ठेवत नाहीत. 'ठावठिकाना' (पृ. ५२-५३), 'जळो जिणे लाजिरवाणे' (पृ. ५४-५५), 'भर रस्त्यावर' (पृ. ७१-७२), 'वाई' (पृ. ७९-८२) या कविता येथे उदाहरणादाखल सांगता येतील. दैनंदिन जीवनातील अतिशय सामान्य घटना या त्यांच्या काव्यविषय होताना दिसतात. त्या दृष्टीने 'मध्यमवर्गीय', 'फेरीवाला', 'फिटनेस', 'दीड पायाचा माणूस', 'मुलीने विचारलेले काही प्रश्न', 'ज्येष्ठ मित्र' या कविता मुळातून वाचण्यासारख्या आहेत. अवतीभवतीच्या वास्तवाकडे कवी एका विवक्षित दृष्टीने पाहतो आणि त्यात त्याला काव्यविषय गवसतो. साध्याच गोष्टीतील काव्य मग वाचकालाही अस्वस्थ, अंतर्मुख करते.

डॉ. जाधव देवभोळेपणा, स्त्री-पुरुष संबंधामधील यांत्रिकता, जातधर्म यांच्यातील पोकळपणा या गोष्टींमुळे कमालीचे अस्वस्थ होतात. ते आपली ही अस्वस्थता व्यक्त करताना कधी हतबल झालेले जाणवतात, तर कधी तत्वचिंतकाची तटस्थताही प्राप्त करताना जाणवतात. एकंदरीत, त्यांच्या मनातील भावनिक आणि वैचारिक कोलाहल ते रसरशीतपणे व्यक्त करतात. त्यासाठी वापरलेले शब्द आणि वापरलेली भाषा सहज, सोपी आणि मनाला थेट भिडणारी अशी आहे. संग्रहातील हा आशय जसा अस्वस्थ करायला लावणारा आहे, तसाच संग्रहाचा बहिरंगही अस्वस्थेची भावना अधिक गडद करणारा जाणवतो. या दृष्टीने संग्रहाचे 'तीव्र एकांतातल्या जीर्ण काळोखात' हे शीर्षक पुरेसे सूचक, अर्थपूर्ण आणि संग्रहातील आशयाला साजेसे असे म्हणता येते. 'ग्रंथाली'ने प्रकाशित केलेल्या डॉ. मनोहर जाधव यांच्या या संग्रहात नव्वदोत्तर काळाचे यथार्थ प्रतिबिंब पडलेले आहे असे निश्चितपणे म्हणता येते.

◆

**डॉ. अविनाश सांगोलेकर**
चलभाष : ९८५०६१३६०२



अनुक्रमणिका

# लोकसंस्कृतीच्या प्रवाहातील वैचारिक कथा




**आटपाट नगरीच्या कथा**
**डॉ. द. ता. भोसले**
**ग्रंथाली प्रकाशन**
**पृष्ठे : १३५**
**मूल्य : १५० रु.**



निसर्ग हा माणसाचा खरा गुरू. माणूस कितीही शिकला तरी निसर्ग काही गोष्टी ज्या देतो त्या माणसाला स्वीकाराव्याच लागतात. आज विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या युगात माणूस झपाट्याने बदलतो आहे, प्रगतिपथावर जाण्यासाठी धडपडतो आहे. असं असलं, तरी बालवयात कानावर पडणाऱ्या असंख्य गोष्टी आयुष्यभर जेव्हा लक्षात राहतात तेव्हा त्या गोष्टींची आणि त्यातील संदेशाची जाणीव अधोरेखित होते, काळजावर ठसते ती कायमचीच. पूर्वीची आजी कनवटीला रुपया ठेवायची, खूप जपायची, ऐन वेळी वापरायची. सगळ्या कुटुंबाला आजीच्या कनवटीच्या रुपयाचं महत्त्व कळायचं. आजीने गोष्ट सांगायला सुरुवात केली की ती संपूच नये असं वाटायचं. आजीच्या गोष्टी अर्थपूर्ण, मानवी जीवनाला पूरक अशा असायच्या. आजी एवढं सांगायची याला कारण तिचं पाठांतर. आजही खेडोपाडी सण-समारंभाच्या निमित्ताने अनेक गाणी गायिली जातात. या स्त्रियांना ती इतक्या मुखोद्गत असण्याचं कारण म्हणजे प्रचंड पाठांतर. अशा असंख्य गोष्टी हस्ते-परहस्ते प्रदान केल्यासारख्या पिढ्यान्‌पिढ्या रुजल्या. या कथांमध्ये संस्कृती होती- विचार होता- साहित्य होतं- भावना आणि संवेदना होत्या- चालीरीती-रूढी-परंपरांचं एक अचूक भान होतं. वाडवडिलांचा, आजी-पणजीचा हा काळ एकत्र कुटुंबपद्धतीला मायेच्या ओलाव्याने बांधून ठेवणारा होता. आज सुधारित जगात अशा गोष्टी सांगण्या आणि ऐकण्यासाठी वेळेचा अभाव, ही वस्तुस्थिती असली तरी अशा गोष्टींचा-कवितांचा-उखाण्यांचा-लोकगीतांचा लोकसाहित्याच्या पातळीवर संस्कृतीचा एक खजिनाच ठरतो. जुन्या-पुराण्या काळातला राजा-आटपाट नगर-राजकन्या-राजाचा दरबार-गोष्ट-गोष्टीतली गोष्ट-काव्यमय ओळी-शब्द आणि भावनांना दिलेलं रूप-गोणीतल्या गमतीजमती-ऋषिमुनींच्या कथा-गोष्टीतून मिळणारा बोध आणि ज्ञानसंपन्न सुसंस्कृतता या सगळ्यातून लोकसाहित्य हा वाङ्मयप्रकार रूढ झाला आहे. लोकांची सामाजिक संस्कृती जिभेवर स्थिरावली. लोककथा-लोकगीतं या माध्यमातून लोकसाहित्य अजरामर ठरलं.

डॉ. द. ता. भोसले हे प्रसिद्ध ग्रामीण लेखक. ग्रामजीवनातले सगळे ताणेबाणे, उंबऱ्यापासून गावचावडीपर्यंतचा, चुलीपासून खेड्यातल्या राजकारणापर्यंतचा व्यापक आणि दीर्घ पट त्यांनी आपल्या कथालेखनातून आणि ग्रामसंस्कृतीविषयीच्या विचारमंथनातून मांडत ग्रामीण साहित्यात स्वत:चं स्थान निर्माण केलं आहे. लोकसाहित्याचा बाज सांभाळत, मात्र वर्तमान जीवनाचे संदर्भ सांगणारा 'आटपाट नगरीच्या कथा' हा ग्रंथाली प्रकाशनाकडून प्रसिद्ध झालेला त्यांचा कथासंग्रह. या लेखनामागचं निमित्त जरी हा कथासंग्रह असला, तरी एकूण लोकसंस्कृती आणि आजच्या समकालीन प्रश्नांचा आणि मानवी जीवनमूल्यांचा घेतलेला शोध एकूण जीवनात महत्त्वाचा आहे. लोककथेचं तंत्र, कथनशैली, राजा-प्रजा यांतील संवाद, मानवी स्वभावाचे अनेकविध पैलू हे सगळंच खूप भावणारं आणि अर्थबोध करणारं असं आहे. या दृष्टीने या कथासंग्रहाकडे पाहताना जीवनाविषयीची मौलिकता शब्दबद्ध होते.

ग्रामजीवनाला दावणीच्या जनावरांचा मोठा आधार असतो. एका नगरीतल्या सामान्य स्त्रीची एक म्हैस हरवली आहे. तो बळीराजा आपली तक्रार राजाकडे नोंदवायला येतो, तर राजदरबारातला शिपाई दारातच अडवून 'राजापेक्षा ब्राह्मणाकडे जा' असं सुचवतो. खूप विचार करून तो माणूस ब्राह्मणाकडे जातो. ब्राह्मणाच्या अव्वाच्या सव्वा अटी आणि मागणं पाहून तो प्रथमदर्शनी वैतागतो, मात्र नंतर त्याही गोष्टीला तयार होतो. भरपूर दक्षिणा, केळीचा घड, पेढे, साखर, नारळ, महावस्त्र इ. गोष्टी द्यायला तयार झाल्यावर ब्राह्मण म्हशीबद्दल बोलतो. नेमकी तुझ्या वैऱ्याच्या दारी म्हैस पोहोचल्याचं सांगतो. म्हैस परत मिळवायची तर शांती घालायला हवी. मग ज्ञान-अंतर्ज्ञानाच्या गप्पा आणि अजूनही इतका गरीब कसा आहेस, असा तिचा प्रश्न ब्राह्मणाला पळता भुई थोडी करतो. म्हातारीला एक रुबाबदार माणूस भेटतो आणि तो म्हैस हरवल्याची बाब ऐकून घेतो. चांगली विचारपूस करून असंख्य प्रश्नांची सरबत्ती करतो. राजाच्या आणि प्रधानाच्या कानावर घालून चौकशी समिती नेमण्याचं आश्वासन देतो. चौकशी समिती, त्यासाठीचा कालावधी, मग निर्णय या सगळ्या गोष्टी आजच्या वर्तमानाशी निगडित पण कथाप्रवाहात चपखलपणे बसवल्या आहेत. म्हातारी परतीचा प्रवास करताना वाटेत मारुतीचं-मरीआईचं देऊळ, दर्शनानंतर तिथे भेटलेली दोन माणसं, दागदागिन्यांनी नटलेली. एक सोनार, तर दुसरा व्यापारी. आपल्या व्यवसायाची चर्चा आणि कमाईची भाषाच



अनुक्रमणिका



ते बोलत असतात. ते म्हातारीची व्यथा समजून घेतात, मात्र ते इथे एकमेकांना दूषणे देत राहतात. दुधात पाणी मिसळून देणारा गवळी असो की धान्यात खडे मिसळणारा व्यापारी असो, स्वार्थीवृत्तीचं दर्शन इथे घडते. आता म्हशीवद्दल कुठेच काही बोलायचं नाही असं ठरवून घराकडे परतणाऱ्या म्हातारीला नातवंडं आपल्या दिशेने धावत येताना दिसतात. ती म्हातारीला बिलगतात आणि म्हणतात, ''आजे, आजे, आपली मैना म्हस गावली! आपणहून घरला परतली.'' म्हातारीचं मन भरून येतं. इथे गोष्ट संपली तरी संपूर्ण कथेच्या दरम्यान व्यक्त होणारी वर्तमान स्थितीची एकूण परिस्थिती सहजपणे आली आहे. समाजातला स्वार्थ, दुष्टपणा, लबाड आणि ढोंगीपणा, भावनाशून्य माणसांची विकृती, हरवल्याच्या दु:खापेक्षा त्यांच्या जखमेवर मीठ चोळताना वाटणारा कुत्सितपणा यांचं व्यापक रूप कथेच्या अंतरंगात ठासून भरलं आहे. मात्र, कथेत येणारी तात्त्विकतेची बाजूसुद्धा तितकीच महत्त्वाची आहे. ढोरांसंगं ढोरांसारखं आयुष्य जगणारी अडाणी (पृष्ठ १०), चांगल्या वागण्याला माणसं बदनाम करत असतील तर कशाला चांगलं वागावं? (पृष्ठ ९), माणसं आपण शेण खातात आणि दुसऱ्याचं तोंड हुंगतात (पृष्ठ ९), यांसारखी विधानं कथालेखकाच्या जीवनाकडे सूक्ष्म बघण्याचं अवलोकन व्यक्त करतात.

निसर्ग हा माणसाचा पहिला गुरू याची जाणीव करून देणारी 'सोमवारची कहाणी' ही कथा म्हणजे जंगलात शिक्षा भोगणाऱ्याला निसर्गाशी जुळवून घेतानाचं दिसणारं रूप काही शिकवणारं असं आहे. विचार, भावना आणि कृती महत्त्वाची आहे. प्रत्येक गोष्टीत आनंद शोधताना सामान्य माणूस चुकून वाईट मार्गाला जातो आणि गुंड बनतो. गुंडाच्या हातून बलात्कार घडतो आणि त्याची शिक्षा म्हणून त्याला दूरवर जंगलात सोडलं जातं. जंगल म्हणजे झाडं-वेली-पशू-पक्षी-प्राणी यांचाच सहवास. मात्र, गुंडाला दिलेली शिक्षा हळूहळू हवीशी वाटू लागते कारण सकाळच्या वेळेचा पक्ष्यांचा किलबिलाट, प्राण्यांचे विविध प्रकारचे कानावर पडणारे आवाज, स्वच्छ आणि प्रसन्न हवा, कुठल्याही गर्दी-गोंगाटापासून दूर आल्याने मनाला मिळणारा दीर्घ आनंद, प्रत्येक गोष्टीत मिळणारा आनंद यातून आयुष्याची सुंदरताच व्यक्त होते. निसर्गच सखा-सोवती आणि जिवाभावाचा दुखलं-खुपलं ऐकून घेणारा असा म्हणूनच महत्त्वाचा वाटतो. या अर्थाने निसर्ग गुरू बनतो. जंगलाच्या मांडीवर खेळणारा माणूस खरा आनंदी, समाधानी आणि खऱ्या शांतीच्या जगात राहतो. त्याचा स्वार्थ आपोआप गळून पडतो. ज्याचे सुखोपभोग आणि गरजा कमी तोच खरंखुरं आयुष्य जगतो (पृष्ठ २४). ही निसर्ग आणि माणूस यांच्यातील भावनांची सांगड घालून कथाकारांनी जगण्याचाही लळाच लागायला हवा, म्हणजे मनातले दुष्ट आणि अविवेकी विचार बाजूला जातील आणि आयुष्याची सुंदरता कळेल, हे लेखकाने सुचवलेलं आहे. माणूस नको पण निसर्ग हवाच, इतकी दीर्घ व्यापकता सांगतानाच लेखकाने वाचकांना अंतर्मुख केले आहे.

अन्नदान ही दान देण्याची मोठी आत्मसमाधानाची बाब आहे. भुकेलेल्यांना अन्न देणारी आपली संस्कृती आहे. म्हणूनच दातृत्वाचा संस्कार जतन करताना माणूस कुठल्याही विचारात असला तरी जीवनाकडे डोळस वृत्तीने बघून भावनेलाच पूर्णत: अधोरेखित करतो. अशा व्यापक विचाराची 'अन्नदान' ही कथा वाचकाला खिळवून ठेवते. एकाचं मरण म्हणजे दुसऱ्याचं जगणं, हे जीवनातलं भयानक सत्य माणसाच्याच मुखात असतं. माणसाला वाचवणारी आणि त्याचं आयुष्य कुरतडून टाकणारी भूक प्रखरतेने मांडली आहे. प्रापंचिक त्याग, संन्यासाश्रमाची गरज, पारमार्थिकतेची दिशा या सगळ्यात जीवनाचा डोळसपणा व्यक्त होत होता. परमार्थाच्या मार्गावरची साक्त पायरी म्हणजे प्रपंच (पृष्ठ १२७) असे विधान प्रापंचिक जीवनाची ओळख घडवून देते, तर शरीराच्या भुकेसाठी गृहस्थाश्रम आणि आत्म्याच्या भुकेसाठी संन्यासाश्रम महत्त्वाचा (पृष्ठ १२८), याचं विस्तृत विवेचनही लेखकांनी पटवून दिलं आहे. लोकसंचिताचा केवळ बाज नाही, तर कथेची विस्तृतता इथे व्यक्त होताना दिसते.

थोडक्यात, या सगळ्याच कथांमधून लोकसंस्कृतीची दीर्घ अशी व्यापकता व्यक्त होते. लोकसंस्कृतीचा मूलाधार आणि आजच्या भिडणाऱ्या वर्तमान प्रश्नांची सोडवणूक करता करता समाजातील जीवनमूल्यांचा कथाकाराने घेतलेला शोध लक्षात राहणारा आहे. जीवन आनंददायी आहे; मात्र, या आनंदाचं सुखदायी चित्र अनुभवताना आजच्या खेड्यातल्या बदलत जाणाऱ्या असंख्य गोष्टींना पाहिल्यावर आपण अंतर्मुख होतो. राजाच्या दरबारातल्या गोष्टींचं प्रबोधन म्हणजे उपहासात्मक पातळीवरचा विनोदही जीवनशैली शिकवतो. मग हे प्रबोधनही महत्त्वाचंच वाटू लागतं. अशी सर्वार्थाने लोकजीवनाची, माणसांच्या स्वभावचित्राची आणि जगण्याच्या उत्कटतेची मौलिक श्रेष्ठता सिद्ध करणाऱ्या या कथा आहेत. एकाचं मरण म्हणजे दुसऱ्याचं जगणं असतं. हे जीवनातलं प्रखर वास्तव कथनाला घट्ट पकडून ठेवतं. अशी किती तरी प्रसंगमांडणी, विचारमांडणी आणि कथाप्रवाहात येणारी सहजता लेखनाची गती मांडते

लोकसंस्कृतीच्या प्रवाहातली वैचारिकता, राजा-प्रधान यांची प्रातिनिधिकता, वर्तमान परिस्थितीत छळणारे असंख्य प्रश्न आणि प्रबोधनाबरोबर व्यक्त झालेली कथनात्मकता, प्रासादिक भाषाशैली या गुणवैशिष्ट्यांसह कथासंग्रह परिपूर्ण बनला आहे. ग्रंथालीने योग्य बांधणीसह कथेला न्याय दिला आहे.

◆ डॉ. चंद्रकांत पोतदार
चलभाष : ९४२३२८६४७९

# विविध वाटा शोधणारं 'माझं आभाळ'



माझं आभाळ
रवींद्र बेडकीहाळ
लोकजागर प्रकाशन, फलटण
पृष्ठे : ११७
मूल्य : १०० रु.

'माझं आभाळ' हा रवींद्र बेडकीहाळ यांचा काव्यसंग्रह प्रकाशित झाला आहे. त्यांचा हा पहिला कवितासंग्रह. या संग्रहातून कविहृदयात स्थापित असलेलं निसर्गप्रेम, नात्यांची गुंफण, देशप्रेम, सामाजिक भान असे विविध भावाविष्कार काव्यातून उतरलेले दिसतात. प्रेमभावना हा तर कवीचा स्थायीभाव. ही भावना व्यक्त करताना कवीने म्हटलंय,

*तुझ्या स्पर्शात मधाळ चांदणे*
*त्यातून फुलते प्राजक्ताचे गाणे.*

अशा ओळी मनात आल्हाददायक गारवा निर्माण करतात आणि प्रेमभावनेतली माधुरी वाढवत ठेवतात. मनाला कोमल भावनेचा स्पर्श करत कवीने म्हटलंय-

*झुकलेल्या पापणीत आपले बकुळस्वप्न*
*अजून थबकले आहे अबोल प्रतीक्षेत*

ही कोमल भावना कवी जपून ठेवतो, तरी त्याचं मन भवतालच्या वातावरणात शिरत असतं. नैसर्गिक आपत्तींनी दुभंगलेल्या समाजाला करुणेने साद घालत कवी म्हणतो,

*संकटाच्या अंधारातील सर्वांना मदतीसाठी*
*माझ्यातली एक ज्योत घ्या.*

आपल्यातल्या पत्रकाराच्या भूमिकेतून कवीची शोधक नजर सर्वत्र भिरभिरत राहते. अनेक विषय मनाला स्पर्शून जातात. काही विषय मनाशी संवाद करत राहतात. काही विषय खोलवर रुजतात, तर काही विषय कवीला अपार अस्वस्थ करून सोडतात. प्रतिवर्षी येणाऱ्या गणपती उत्सवाच्या गणरायास आवाहन करताना कवीने म्हटलंय,

*तुला यायचेच असेल तर*
*क्रांतिकारक तरुणांचा नेता बनून ये*
*नृसिंहमूर्ती बनून*
*भ्रष्टाचार, अत्याचार, लाचलुचपत, काळाबाजार*
*यांची पोटे फाडत कर्दनकाळ बनून ये.*

सर्वत्र चाललेला अनाचार पाहून कवीचं मन सतत आक्रंदून उठत राहतं.

'अनादिपासून... अंतापर्यंत', 'साकडे', 'आभाळातला सूर्यास्त' अशा काही रूपकात्मक काव्यरचना मनाला वस्तुपाठ देत राहतात. आपल्यातल्या सनातन विचारांना वेगळी दिशा देण्याचा प्रयत्न करतात.

मातेचं माहात्म्य काव्यबद्ध करताना भावव्याकूळ होत कवीने म्हटलंय, 'पोटचं लेकरू... आणि त्याच्यावरची माया, त्याची सुखदुःखं हेच तिचं विश्व असतं... जगण्या-मरण्यातली सीमारेषाही तीच असते.'

संग्रहातल्या बऱ्याचशा कविता मुक्तछंदातल्या आहेत. अगदी मोजक्या कविता छंदोबद्ध आहेत. अलीकडच्या काळात मुक्तछंदातल्या रचनाच जास्त दिसतात. वेगळेपणाचं स्वागत होत राहतं. छंदोबद्ध काव्यरचनांमध्ये जो आत्मा असतो, मनाचा ठाव घेणारा गाभा असतो त्याचा अभाव मात्र या रचनांमध्ये वाटत राहतो.

रवींद्र बेडकीहाळ यांची कवी म्हणून नव्याने ओळख करून देणारा 'माझं आभाळ' हा कवितासंग्रह त्यांच्या काव्यप्रतिभेची साक्ष देतो. 'श्रावणातल्या प्राजक्ता', 'फक्त तूच', 'अबोल अबोली', 'रितेपणा', 'सुदर्शनचक्र' अशा काही कविता मनाला भावतात पण पूर्णतः भिडत नाहीत. तरीही 'मी एक कॅक्टस...', 'येणार असशील...', 'विझू नकोस... भिऊ नकोस', 'तुफान', 'एका क्षणातले आभाळ' यांसारख्या काही कविता खोलवर नेण्याचा प्रयत्न करतात.

एकंदरीने, बेडकीहाळांचे कवितेत शिरण्याचं प्रयोजन स्वागतार्ह आहे. यशाचे पुढचे टप्पे गाठण्यासाठी सराव करत राहावं लागतंच, तरच दूरचे दिवे जवळ येतात. बेडकीहाळांमधला जिद्दी, स्वयंप्रकाशी माणूस तेवढे प्रयास नक्कीच करेल.

◆

नंदा सुर्वे
चलभाष : ९४२३५३३२४०








महाराष्ट्र साहित्य परिषद

# मुख्य शाखा कार्यवृत्त

(३१ ऑगस्ट २०१५ ते ३० नोव्हेंबर २०१५)

**दि. ३१ ऑगस्ट २०१५**

**'मृत्युंजय'कार शिवाजी सावंत यांच्या ७५व्या जयंतीनिमित्त विशेष व्याख्यान :**

या निमित्ताने डॉ. सागर देशपांडे यांचे 'आठवणीतले शिवाजी सावंत' या विषयावर व्याख्यान झाले. मृणालिनी सावंत यांनी या वेळी मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी, तर सूत्रसंचालन प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले.

**दि. ६ ऑक्टोबर २०१५**

**द. वा. पोतदार स्मृती पुरस्कार वितरण समारंभ :**

हा पुरस्कार डॉ. सुवर्णलता जाधवराव यांच्या 'रणझुंझार पिलाजी जाधवराव : पत्ररूप इतिहास' या ग्रंथाला इतिहास संशोधक पांडुरंग वलकवडे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. या कार्यक्रमाला शुभलक्ष्मी पोतदार उपस्थित होत्या. या पुरस्कारासाठी परीक्षक म्हणून महेश तेंडुलकर आणि अजित पटवर्धन यांनी काम पाहिले. या वेळी जाधवराव, तेंडुलकर आणि बलकवडे यांनी मनोगत व्यक्त केले. प्रकाश पायगुडे यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक, तर सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**दि. १६ व १७ ऑक्टोबर २०१५**

**पुणे बुक फेअर :**

मसाप आणि पुणे बुक फेअर आयोजित ग्रंथप्रदर्शनाच्या निमित्ताने दि. १६ ऑक्टोबर रोजी बालकुमारांसाठी कविता लिहिणाऱ्या कवींचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. यात डॉ. नीलिमा गुंडी, डॉ. संगीता बर्वे, हेमा लेले, आश्लेषा महाजन, कविता क्षीरसागर यांनी कवितांचे वाचन केले आणि आपले मनोगत व्यक्त केले. दि. १७ ऑक्टोबर रोजी कथाकथनाचा कार्यक्रम झाला. यात डॉ. प्रतिमा इंगोले आणि धर्मराज निमसरकर सहभागी झाले. या दोन्ही कार्यक्रमांना परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य आणि पुणे बुक फेअरचे अरुण भावे उपस्थित होते. दोन्ही कार्यक्रमांचे सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**दि. ८ नोव्हेंबर २०१५**

**नवनिर्वाचित संमेलनाध्यक्षांचा सत्कार समारंभ :**

८९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल ज्येष्ठ समीक्षक डॉ. श्रीपाल सबनीस यांचा मसापच्या वतीने मसापचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. या वेळी संमेलनाध्यक्ष डॉ. सदानंद मोरे, डॉ. माधवी वैद्य, डॉ. भालचंद्र शिंदे, प्रकाश पायगुडे, सुनील महाजन उपस्थित होते. इतर काही संस्था-व्यक्तींनीही डॉ. सबनीस यांचा सत्कार या वेळी केला. या वेळी डॉ. मोरे, डॉ. शिंदे, डॉ. सबनीस आणि डॉ. शेजवलकर यांनी मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी, स्वागत प्रकाश पायगुडे यांनी, आभार सुनील महाजन यांनी, तर सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**दि. १७ नोव्हेंबर २०१५**

**योगिनी जोगळेकर स्मृतिदिन :**

या निमित्ताने ज्येष्ठ कवयित्री डॉ. अरुणा ढेरे यांचे 'मुक्तचिंतन कवितेविषयी' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी सुधन्वा जोगळेकर, माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे

आणि सुनील महाजन यांची उपस्थिती होती. दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**दि. २७ नोव्हेंबर २०१५**

**अहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन :**

या निमित्ताने डॉ. वा. ल. मंजुळ यांचे 'मराठी हस्तलिखिते : शोध आणि बोध' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी राजवाडे यांच्या साहित्याचे अभ्यासक विवेक रणखांब यांनी मनोगत व्यक्त केले. या कार्यक्रमाला राजवाडे कुटुंबीय उपस्थित होते. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला, तर दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**दि. २८ नोव्हेंबर २०१५**

**स्वामी स्वरूपानंद स्मृती व्याख्यान :**

या निमित्ताने 'माउलींची गुरुभक्ती' या विषयावर रामराया सांगवडेकर यांचे व्याख्यान झाले. या वेळी वसंतराव देसाई, शशिकांत पागे, नरेंद्र पटवर्धन, उल्हासदादा पवार, प्रकाश पायगुडे, डॉ. कल्याणी दिवेकर आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**दि. ३० नोव्हेंबर २०१५**

**माधव ज्युलियन स्मृतिदिन :**

या निमित्ताने 'कविता सादरीकरण आणि कवितेवर चिंतन' या विषयावर कवी हेमंत जोगळेकर यांचे व्याख्यान झाले. यानंतर मंजिरी धामणकर यांनी 'आश्रा- उर्दू शायरीची मराठी सखी' हा कार्यक्रम सादर केला. डॉ. माधवी वैद्य यांनी कार्यक्रमाचे स्वागत व प्रास्ताविक केले, तर दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.



# शाखा कार्यवृत्त

(दि. ३० नोव्हेंबर २०१५ पर्यंत)

**जुळे सोलापूर शाखा**

**दि. २२ जून २०१५ :** या दिवशी मसाप जुळे सोलापूर शाखा आणि इतर शाखा, तसेच लोकमंगल फौंडेशन यांच्या संयुक्त विद्यमाने आमदार सुभाष देशमुख यांच्या 'संवाद' या ललितलेख संग्रहाचे प्रकाशन आकाशवाणीचे कार्यक्रम अधिकारी सुनील शिनखेडे आणि चित्रकार रविमुकुल यांच्या हस्ते झाले. या वेळी शाखेचे अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते, कार्यकारिणीचे सदस्य आणि मोठ्या संख्येने साहित्यरसिक उपस्थित होते.

**दि. १३ सप्टेंबर २०१५ :** जुळे सोलापूर शाखा, पद्मगंधा प्रकाशन आणि निशाणदार परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ. नीलिमा निशाणदार यांच्या 'घर सैनिकाचे' या पुस्तकाचे प्रकाशन मसाप सोलापूर शाखेचे अध्यक्ष डॉ. सुहास पुजारी यांच्या हस्ते करण्यात आले. या वेळी डॉ. अक्षयकुमार काळे, अरुण जाखडे, प्रा. देवानंद सोनटक्के यांची प्रमुख उपस्थिती होती. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. वासुदेव रायते यांनी, तर आभार डॉ. माधवी रायते यांनी मानले.

**दि. २२ नोव्हेंबर २०१५ :** या दिवशी स्व. दत्ता हलसगीकर श्रेष्ठ साहित्यिक पुरस्कार प्रा. मिलिंद जोशी यांना विशेष सरकारी वकील उज्ज्वल निकम यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष सायली जोशी यांनी, अॅड. निकम यांचा परिचय प्रशांत जोशी यांनी, आभारप्रदर्शन कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी, तर सूत्रसंचालन माधव देशपांडे यांनी केले.

◆

**प्रकाश पायगुडे** (प्रमुख कार्यवाह)

कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर**



अनुक्रमणिका





# काही क्षणचित्रे



संमेलनाच्या ग्रंथदिंडीत सहभागी झालेले संमेलनाध्यक्ष डॉ. रामचंद्र देखणे, स्वागताध्यक्ष आ. महेश लांडगे, राजन लाखे, दीपक करंदीकर व इतर मान्यवर.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे
**२४वे विभागीय मराठी साहित्य संमेलन, भोसरी**
दिनांक : १ व २ डिसेंबर २०१५



उद्घाटन कार्यक्रमात बोलताना संयोजक मुरलीधर साठे.



उद्घाटन कार्यक्रमात अध्यक्षीय भाषण करताना डॉ. रामचंद्र देखणे

व्यासपीठावर पद्माकर कुलकर्णी, सुनील महाजन, प्रकाश पायगुडे, डॉ. माधवी वैद्य, विठ्ठल वाघ, मोहन जोशी, डॉ. रामचंद्र देखणे, डॉ. पी. डी. पाटील, आ. महेश लांडगे, वीरा राठोड आदी मान्यवर.




संमेलनाच्या समारोप कार्यक्रमात डावीकडून प्रभाकर संत, विजय कोलते, सुभाषराव गेठे, ॲड. सतीश गोरडे, विठ्ठल वाघ, डॉ. रामचंद्र देखणे, सौ. देखणे, डॉ. माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे, पद्माकर कुलकर्णी, मुरलीधर साठे, डॉ. रोहिदास आल्हाट, पुरूषोत्तम सदाफुले

बु


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : December 2015
Registered with the Register of Newspaper for India under No. 6
Book Pkt. Periodical Category



अनुक्रमणिका









